# खरा सत्यशोधक

लेखक

श्री. गो. ल. आपटे, बी. ए.





भ्रमरमंडळ.

किंमत बारा आणे.

प्रकाशक—

विश्वनाथ गणेश ताम्हनकर,

मॅनेजिंग डायरेक्टर,

म[illegible]ब्लिशिंग हाऊस लिमिटेड,

[illegible] बुधवार पेठ, पुणें.

मुद्रक—

पानें १-१३९-काशिनाथ रावजी पालवणकर,

मौज प्रिंटिंग ब्यूरो, मुंबई नं. ४

कव्हर, वगैरे-गोपाळ बळवंत जोशी,

आनंद छापखाना, सदाशिव पेठ, पुणें.

# "आमची प्रस्तावना !!"

देशभक्त म्हटला कीं जशी त्याच्या अंगावर खादी हवी, सुवासिनी म्हटली कीं जसें तिच्या कपाळीं कुंकू हवें, कॉलेजांतील तरुण म्हटला कीं जशी त्याच्या तोंडांत सिगारेट हवी, तसेंच पुस्तक म्हटलें कीं त्याला प्रस्तावना ही हवीच! प्रस्तावनेवांचून पुस्तक म्हणजे विधवेचें कपाळ होय! ती दोन पानांची मेळ्याची पद्यावली असो कीं सहा हजार पानांचा अगडबंब ग्रंथ असो. दोहोंनाही प्रस्तावनेची सारखीच जरूरी आहे. गुंडोपंतांच्या कोऱ्या रोजनिशीला सुद्धां प्रस्तावना जोडण्यांत खरें स्वारस्य हेंच आहे. शाळेंतल्या पोरांना लागणाऱ्या चारदोन पैशांच्या चिमुकल्या चोपड्यांना मात्र अद्यापपर्यंत प्रस्तावना जोडलेली दिसून येत नाहीं हें आमचें दुर्भाग्य होय! लेखनकलेंतच काय पण इतर हजारों बाबतींतही प्रस्तावनेखेरीज भागत नाहीं! व्याख्यान द्यावयाचें असल्यास अगोदर प्रस्तावना केली पाहिजे. प्रियाराधन करावयाचें असल्यास अगोदर प्रस्तावना करणें अवश्य आहे. प्रस्तावनेवांचून लगट केल्यास प्रियेच्या गालांऐवजीं प्रियकराच्याच गालांवर सूर्योदय होऊन त्याचे डोळे उघडण्याचा जास्त संभव आहे. ठमाकाकूंना तर सकाळीं उठल्याबरोबर बगीच्या पाठींत पांच सहा रपाटे दिल्यावांचून पाऊलच टाकवत नाहीं. ही तरी दिनचर्येची प्रस्तावनाच नव्हे काय?

त्यांतल्या त्यांत एकाद्या बड्या माणसाची प्रस्तावना मिळवणाऱ्या पुस्तकाचें भाग्य कोठवर वर्णावें? प्रस्तावनालेखकाचें नांव वाचतांच पुस्तकाला नांवें ठेवण्याची कोणाची प्राज्ञा आहे? खुद्द पुस्तकांत चांगुलपणाचा लवलेश नसतांही पुस्तकाच्या आवृत्त्या खपविण्याची जादू अशा बड्या प्रस्तावनालेखकाच्या नांवतच कोंदलेली असते. एकदां अशाच एका पुस्तकाला एका 'बड्या' माणसाची प्रस्तावना जोडली आहे. ही बातमी ऐकतांच आम्ही रेसच्या घोड्याप्रमाणें, एका पुस्तकाचे दुकानांत गाढवासारखे धांवत गेलों. धांपा टाकत टाकत आम्ही मोठ्या आतुरतेनें त्या पुस्तकाची मागणी केली. आमची ती कळकळ बघून पुस्तक विकणाऱ्याचा गळा अक्षरशः दाटून आला! बिचारा दुसऱ्याच दिवशीं कफ-क्षयानें निज-

धामास गेला ! बरें झालें कीं सदरहू पुस्तकाबद्दलची आमची आस्था खुद्द लेखकाचें कर्णीं गेली नाहीं, नाहींतर आम्ही एका 'विद्वान्, मार्मिक व महोत्तम' अशा एका लेखकाला कायमचे अंतरलों असतों. तें पुस्तक घरीं आणल्यानंतर त्यांत डोकावून पाहण्याचा आम्ही प्रयत्न केला. अवघ्या दोन तासांत अमृतांजनाच्या सहा बाटल्या कपाळांवर घांसल्या, पण त्या पुस्तकाचीं दोन पानेंही वाचवेनात ! तरी पण तें पुस्तक फारच अप्रतिम होतें यांत शंक नाहीं. कारण खुद्द बड्या प्रस्तावनाकारांनींही तसाच अभिप्राय दिला होता. पुढें पुढें त्या पुस्तकाच्या दर्शनानेंच हिंवतापाचे रोगी साफ बरे होऊं लागले, तेव्हां तर प्रस्तावनेंत केलेल्या लेखकाच्या स्तुतीची आम्हांला खात्री पटूं लागली ! आमच्या गुंडोपंतांनीं एकदा दुसऱ्या लेखकानें लिहिलेलें पुस्तकच चोरून स्वतांच्या नांवाखालीं प्रसिद्ध केलें. पण याच पुस्तकाला एका 'बडया' माणसाची प्रस्तावना घेतांच साऱ्या वर्तमानपत्रांतून गुंडोपंतांच्या 'जिवंत व जातिवंत प्रतिभेवर' स्तुतीचा भडिमार सुरू झाला ! केवळ एका बडया गृहस्थाच्या प्रस्तावनेवर आपल्या चोरीचा एवढा विजय झालेला पाहतांच त्यांना आपल्या धंद्यांत दुप्पट उत्साह वाटूं लागला ! पुढें पुढें दुसऱ्याचें लिखाणच काय पण ते दुसऱ्याच्या वस्तूही चोरूं लागले. तरी त्यांना चोर म्हणण्याची कोणाची छाती होईना ! बडया प्रस्तावनाकाराच्या वशिल्याचा आणखी फायदा तो कोणता हवा ?

प्रस्तावनेची एवढी अगडबंब थोरवी ध्यानांत घेऊन व प्रस्तुत छोट्या कादंबरीला 'बडया' प्रस्तावनाकाराचें शेपूट जोडलें तर तिची फारच वाच्यता होईल या भीतीनेंच केवळ आम्ही स्वतःच आमची प्रस्तावना जोडली आहे. प्रस्तावनेंतच पुस्तकाचा गोषवारा देऊन, पर्यायानें अभिप्राय देणाऱ्यांना जिवाभावानें मदत करण्याचा मार्ग न अवलंबितां फक्त जरूरीचें आभारप्रदर्शन करून ही प्रस्तावना संपवितों.

प्रस्तुत कादंबरींतील सर्व व्यक्ती खरोखरच काल्पनिक जगांतल्या असून त्यांचा कुठल्याही हयात अगर होऊन गेलेल्या व्यक्तींशीं कसलाही संबंध नाहीं ही गोष्ट वाचकांनीं अवश्यमेव ध्यानांत ठेवावी एवढी विनंति आहे.

मदत करणाऱ्या सर्व व्यक्तींचा लेखक ऋणी आहे. त्यांतल्या त्यांत सुप्रसिद्ध नाटककार श्री. दत्तोपंत सारोळकर, मौज पत्राचे धनी श्री. भागवत, आमचे

उत्साही प्रकाशक श्री. ताम्हनकर व मुखपृष्ठ तयार करून देणारे हौशी आर्टिस्ट. आर्. गोडबोले यांचे आभार मानणें म्हणजे कृत्रिमपणा होईल !

सरतेशेवटीं कदाचित् कोठें कडक शब्द पडले असतील तरी कोणाच्याही भावना दुखविण्याचा लेखकाचा अंधुकही विचार नाहीं हें सुज्ञ वाचक व तिखट टीकाकार खात्रीपूर्वक ध्यानांत ठेवतील अशी आशा प्रकट करून व प्रस्तुत कथेचा **सिनेमा चित्रपट** दृश्यस्वरूपांत लवकरच बाहेर पडेल अशी बातमी देऊन रजा घेतों.

भ्रमरमंडळ
८ ऑगस्ट, १९२९.

**लेखक.**



हें पुस्तक

सर परशुरामभाऊ कॉलेज

व

गुरुवर्य प्रि. एन्. एम्. शहा

यांस

सादर समर्पण केलें आहे.

गो. ल. आपटे.

# ' खरा सत्यशोधक '

## प्रकरण १ लें.

## दोन मैत्रिणी.

' इट इज थ्री लव्ह '

' नो, नो, इट इज थ्री वन्! '

' अग वाग वा! केव्हां ग झाली तुझी गेम? '

' अहो बाईसाहेब, म्हटलं पहिलीच गेम माझी होती बरं का? '

विमल आणि सुंदर या दोघी मैत्रिणींमध्यें हा प्रेमळ खटका उडाला. त्याचें असें झालें कीं, खेळाच्या सुरवातीलाच दोघींनी पैज लावली होती. आज बरेच दिवस सुंदर, पिंगपाँगच्या मॅचमध्यें विमलचा पराभव करीत होती. पण आज मात्र ' आपण सुंदरला खास मारूं ' असें विमलला वाटत होतें. आणि म्हणूनच दोघी अगदीं पैज लावून कसबाची कमाल करून खेळत होत्या. भोंवतालीं इतर मैत्रिणींचाही घोळका सामना पाहण्यास जमला होता.

आणि खरें पाहिलें तर पहिली गेम खरोखरच सुंदरनें घेतली होती. पण पुढें ओळीनें तीन गेम्स [illegible] विमल [illegible] गेली. भोंवतालच्या इतर मुलींनीही ' सुंदरनें पहिली गेम घेतली आहे. ' असें म्हटल्यावरून खेळ पुढें सुरू झाला! ' विमल आज आपला खरोखर पराभव करते कीं काय? ' अशी भीति सुंदरला किंचित्काल वाटल्यावांचून राहिली नाहीं. ' या पुढील सर्व गेम्स आपण घेऊं ' असा निर्धार करून सुंदरही जोरानें खेळूं लागली.

टेबलाच्या दोहोंबाजूस सुंदर व विमल एकसारख्या डुलत होत्या. चेंडू इकडून तिकडे व तिकडून इकडे एकसारखा उड्या मारीत होता, व चेंडू-बरोबरच इतर मुलींचे नेत्रकटाक्षही इकडे तिकडे फेंकले जात होते. समवयस्क तरुण मैत्रिणी एके ठिकाणीं जमल्या ह्मणजे थट्टा मस्करीला सीमाच उरत नाहीं. मधेंच एकादी मुलगी असा कांहीं गोड विनोद करी कीं, त्यामुळें सर्वंजणी खदखदां हसूं लागत. कित्येक वेळां तर हंसण्याचा अगदीं एकच कल्लोळ उडून जाई व त्यामुळें विमल–सुंदरच्या खेळण्यांतही व्यत्यय येई !

हा सामना विलासपुरांतील एका प्रमुख कॉलेजांतील मुलींच्या खोलींत चालला होता. हें कॉलेज बरेंच नांवाजलेलें होतें. यांतील अध्यापक वर्गही हुषार असा असल्यामुळें यांत विद्यार्थ्यांची संख्याही बरीच होती. कॉलेज-जवळच विद्यार्थ्यांकरितां एक वसतिगृह बांधलें असून परगांवच्या विद्यार्थिनींकरतांही दुसरें छोटें वसतिगृह होतें. मुलींच्या वसतिगृहांत सुमारें पन्नास मुली रहात होत्या. शिवाय खुद्द विलासपुर शहरांत राहणाऱ्या अशा बऱ्याच मुली कॉलेजांत होत्या. सुंदर वसतिगृहांत रहात असे. आणि या दृष्टीनेंहि वरील सामन्यास एक निराळें मजेचें स्वरूप प्राप्त झालें होतें. वसतिगृहांत राहणाऱ्या मुलींना आपल्या सुंदरचा जय व्हावा असें वाटत होतें तर शहरांत राहणाऱ्या मुली विमलच्या बाजूच्या होत्या.

पण यावरून विमल व सुंदर ह्मणजे एकमेकींच्या दुस्मन् होत्या असें मात्र नव्हे. उलट त्या खरोखरीच अगदीं बहिणीबहिणीप्रमाणें होत्या. दोघी एकाच वर्गांत ह्मणजे फर्स्ट इयरमध्यें होत्या. कॉलेजांत आल्यावर साहाजिकच एकमेकींची ओळख झाली होती. पण आश्चर्याची गोष्ट ही कीं विमल ब्राह्मणकन्या असून सुंदर जातीनें ब्राह्मणेतर प्रभूज्ञातीची होती. पण मैत्री जातिजन्मावर कधीही अवलंबून राहात नसते ! !

विमल दादासाहेब देशपांड्यांची अगदीं एकुलती एक मुलगी होती. दादासाहेब स्वतःच्या भव्य घरांत, खुद्द विलासपुरांतच राहात होते. सरकारी नोकरींत असतांना यांना चांगला आठशें रुपये पगार मिळत असे. पण तूर्त त्यांनीं चारशें रुपये पेन्शन पत्करलेलें होतें. ते स्वभावानें दिलदार

व यांत होते. विमलची आई सुद्धां फार प्रेमळ बाई होती. विमल मॅट्रिक झाली त्या दिवशीं दादासाहेबांना धन्य झालें. आपल्याला मुलगा झाला नाहीं ह्या बद्दल विमलच्या आईला कधींच वाईट वाटलें नाहीं.

विमलचें वय फार फार तर विसाचे आंतबाहेर इतकेंच असेल. आईचा प्रेमळपणा तिचे अंगीं पुरेपूर उतरला होता. खुद्द दादासाहेब जरा सुधारकच असल्यामुळें विमलचा पोषाखही सुधारकी थाटाचा होता. बूट घातल्याखेरीज ती कधींच बाहेर जात नसे. तिचें नेसतें पातळ अस्सल विलायती सुताचें असे. सायकल, घड्याळ, चष्मा ह्या वस्तू तर ती नेहमींच वापरी; सायंकाळीं फिरावयास जातांना ती हातांत मनिबॅग अडकविण्यास कधींच विसरली नाहीं. पण यावरुन तिच्या स्वभावाविषयीं मात्र कोणीही आपला दूषित ग्रह करुन घेऊं नये.

विमलला उपमाच द्यावयाची झाल्यास ती एखाद्या फुलपांखराची द्यावी लागेल. तिचा बाह्य डौल अक्षरशः फुलपांखरासारखाच असून तिचें अंतःकरण, हळवें, कोमल व प्रेमळ असें होतें. रस्त्यांत दीनवाण्या किंकाळ्या फोडणारी दुर्दैवी भिकारीण पाहिली कीं हिला खरोखरच कसेंसेंच होऊन सहजगत्या तिचा उजवा हात मनिबॅगमध्यें डोकावूं लागे. एकदां दोन चार दिवस तिची आई तापानें फणफणली होती तर विमलला त्या दिवसांत अन्नही गोड लागलें नाहीं. सगळ्यांत मौजेची गोष्ट अशी कीं रस्त्यांतून जातांना एकादें देवालय लागलें तर मनांतल्या मनांत ही परमेश्वराचा मंगळ धांवा केल्यावांचून कधींही रहात नसे.

शाळा कॉलेजांतून जाणाऱ्या कितीतरी मुली अशा प्रकारच्या असतात. वाटेंत देवालय लागलें तर त्या खरोखरच नजरेनें देवाची प्रार्थना करतात. पण हात जोडून देवापुढें उभें राहूं म्हटलें तर त्या भीडल्याखेरीज कधीं रहावयाच्या नाहींत. परमेश्वरावर त्यांचा विश्वास नसतो असें म्हणणे मुळींच योग्य होणार नाहीं, पण आपण परमेश्वराची हात जोडून प्रार्थना केली तर इतर लोक आपणाला हंसतील असें त्यांना वाटतें. अर्थांत हें त्यांचें अज्ञानच होय ! पण त्यांचें खरें अंतःकरण सात्विकच असतें हें खास ! विमल अशांतलीच एक होती. तिनें रस्त्यांतून, अगर एकाद्या देवालयांत जाऊन हात जोडून, नाक घांसून नमस्कार क्वचित्‌च केला असेल. पण तिच्या अग्या-

ांच्या खोलींत विष्णूची एक रम्य तजबीर हौसेनें टांगली असून रोज सायं-काळीं ती परमेश्वराची पवित्र प्रार्थना करण्यास चुकत नसे.

सुंदरचें घर मुंबईस होतें. पण मुंबईची हवा सुंदरला मुळींच मानवत नसे सुंदरचें शाळेंतलें शिक्षणही विलासपूरच्या मुलींच्या शाळेंत झालें होतें. तेथेंही ती शाळेच्या वसतिगृहांतच रहात असे. आणि मॅट्रिक झाल्यावरही ती विलासपुरांतल्याच कॉलेजांत गेली. तिचे आईबाप तिला मधून मधून येऊन भेटत व ही सुद्धां सुट्टींत एकादा महिना मुंबईस आपल्या घरीं जाई. तिचा एक थोरला भाऊ मुंबईसच ग्रँट मेडिकल कॉलेजांत होता. 'आपल्या मुलीला जर मुंबईची हवा मानवत नाहीं तर आपणच सारा संसार गुंडाळून विलास-पुरांत जाऊन राहूं.' असा विचार आज बरेच दिवस त्यांचें मनांत घोळत होता. सुंदरचे वडील मुंबईस एका मोठ्या कंपनीचे मॅनेजर होते. ते जातीनें कायस्थ असून त्यांचें आडनांव पाटणकर असें होतें.

सुंदरचा स्वभाव म्हणजे विमलचेंच प्रतिबिंब होतें. ती विमलेसारखीच प्रेमळ व हळव्या मनाची होती. पण तिचें नांव सुंदर असलें तरी ती स्वरू-पानें तितकीशी 'सुंदर' नव्हती. आज बरेच वर्षे तिला एकटें राहण्याची संवय असल्यामुळें ती विमलपेक्षां किंचित् धीट होती इतकेंच.

केव्हां केव्हां ह्या जिवलग मैत्रिणींना कांहीं तरी भांडण काढण्याची हुक्की येऊन त्याचें पर्यवसान फुगट्टींत होई. अर्थातच हा अबोला एक दोन दिव-सावर टिकत नसे. असल्या भांडणामुळें त्या दोघींची मैत्री दुभंग न होतां ती अधिकाधिकच दृढ होई हें खास!! त्यांच्या ह्या 'फुगट्टींना' कांहीं तरी कारण लागेच असें नाहीं. केव्हां केव्हां तर अगदीं एकाद्या क्षुल्लक प्रकारा-वरूनही त्या अबोला धरीत.

एकदां अशी गम्मत झाली कीं कॉलेजला सुट्टी होती तेव्हां विमल आप-ल्या मैत्रिणीच्या म्हणजे सुंदरच्या खोलीकडे घरीं करमेना म्हणून गेली. सुंदर त्या वेळीं एक इंग्रजी पुस्तक वाचण्यांत गुंग झाली होती. 'ये विमे बैस.' असे शब्द उच्चारून सुंदर पुन्हां पुस्तकांत गुंग झाली. झालें! इकडे या बाईसाहेबांना फार राग आला. विमल तेथें एका खुर्चीवर बसली ती एक अक्षरही बोलली नाहीं. पांच मिनिटें झालीं, दहा झालीं, अर्धा तास झाला,

तास झाला, कोणी एक चकार शब्दही बोलेना! सुंदर आपल्या पुस्तकांत मग्न व विमल आपल्या रागांत चूर! सरतेशेवटीं साहजिकच तिचें लक्ष एकदम विमलकडे गेलें. ती एकदम चमकली व म्हणाली, 'विमल, केव्हांशी आलीस तूं?' छेः! पण आतां विमल बोलणार कशी? 'आपण अगदीं बोलूं नये' असें तिनें ठरविलें होतें.

'कायग विमल? केव्हां आलीस; इश् बाई बोलत कां नाहींस? अग मी वाचित नव्हतें का तिकडे माझें लक्ष लागलें होतें!...कॉनन डॉइलच्या शेरलॉकची ती मिस्टरी, काय सुंदर होती म्हणतेस?...खरंच, विमल तूं एकदां वाचच हें पुस्तक!'

सुंदरनें बरीच खटपट केली, पण नाहीं. विमल रागावली होती. पण खरें म्हटलें तर विमल इतका वेळ तेथें बसली तरी कशाला? 'सुंदर आपल्याकडे न पाहतां पुस्तक वाचत आहे' हें पाहुन विमल घरीं कां नाहीं निघून गेली? पण मग 'विमल रागावली' हें सुंदरला समजावें कसें?

सुंदरनें विमलला बोलावयास लावण्याचा खूप प्रयत्न केला, पण तो यशस्वी झाला नाहीं. आतां मात्र सुंदरला वाईट वाटूं लागलें. जें पुस्तक वाचण्याच्या भरांत विमलकडे लक्ष न दिल्यामुळें हा अनर्थपात कोसळला तें पुस्तकच रागारागानें सुंदरनें जमिनीवर आपटलें व तत्क्षणींच ती रडूं लागली! सुंदरच्या डोळ्यांतले ते अश्रू पाहतांच विमललाही गहिंवरून आलें. तिचा राग एका क्षणांत निवाला. तिनें सुंदरला एकदम मिठी मारली. दोघींनी एकमेकींकडे पाहिलें. व रडतां रडतां दोघीही खदखदां हसूं लागल्या.

खऱ्या मैत्रींत अशीच जादू आहे. खरी मैत्री अशींच रडतां रडतां खुदकन हंसते. विमल सुंदरची मैत्री अशा अश्रूंमुळेंच दृढ होत होती. वास्तविक पाहतां ह्या दोघींची सहा महिन्याचीच काय ती ओळख. पण प्रेमासारखीच मैत्री सुद्धां एका क्षणाभरांतच उत्पन्न होत असते.

कॉलेजच्या पहिल्या टर्मनंतरच्या सुट्टींत विमल सुंदरबरोबरच मुंबईस गेली होती. आणि या पाहुणचाराची फेड म्हणूनच कीं काय, दुसरी टर्म झाल्यानंतरच्या सुट्टींत सुंदरला आपल्या घरींच, विलासपुरांतच, ठेवून घेण्याचा विमलनें निश्चय केला होता. आणि इतकेंच नव्हे तर विमलच्या

दादासाहेबांनीही, सुंदरच्या वडिलांना उन्हाळ्यांत, विलासपुरांत आपल्या-कडचा पाहुणचार घेण्यास आमंत्रणही केलें होतें.

असो! प्रकरणाच्या आरंभीं वर्णिलेला प्रसंग दुसऱ्या टर्मच्या आरंभीं-चाच होता. कॉलेजांतली दुसरी टर्म ह्मणजे अभ्यासाच्या ऐन दंगलीची असते. तरी पण दुसऱ्या टर्मला नुकतीच सुरवात झाली असल्यामुळें अभ्या-साची अजून फारशी गडबड सुरू झाली नव्हती. आणि ह्मणूनच कॉलेजचे तास सपल्यावरच मुलींनीं आपल्या खोलींत हा 'विमल–सुंदर'चा स्पेशल सामना करविला होता!

चौथी गेमही विमलनेंच घेतली. आतां मात्र सुंदरचा धीर खचूं लागला. 'इतके दिवस आपण विमलचा पराजय करीत होतों खरा पण आज मात्र आपण हरणार' असें सुंदरला वाटूं लागून तिचा हात लटपटूं लागला! शहरांत राहणाऱ्या इतर मुली मोठमोठ्यानें ओरडूं लागल्या व बिचाऱ्या वसतिगृहांतल्या मुली मात्र गप्प बसल्या! विमल तर चौपट उत्साहानें खेळूं लागली. विमलचे कधींही बरोबर न आलेले 'शॉटस्' आतां कर्मधर्मसंयो-गानें बरोबर पडूं लागले. एकदां तर तिनें मारलेला चेंडू, टेबलावर आप-टून, जवळच्याच एका मुलीच्या डोळ्याला फाडकन् लागला. त्या बिचा-रीच्या डोळ्यांतून टपकन पाणीच झिरपलें. त्यांत गंमत अशी झाली कीं डोळ्याला चेंडू लागलेली मुलगी वसति–गृहांतलीच होती. हंशा, टाळ्या, व 'Splendid' 'बेहो' इत्यादी शब्दांनीं ती खोली दुमदुमून गेली.

आणि खरोखरच उरलेल्या दोन्ही गेम्स विमलनेंच घेतल्या. आज तिचा अभूतपूर्व विजय झाला. सुंदर व वसतिगृहांतल्या मुली एकदम आपापल्या खोल्यांत निघून गेल्या. थोड्याच वेळांत विमलही सुंदरच्या खोलीजवळ गेली. पण आंत गेल्याबरोबर सुंदरनें आपल्या खोलीचें दार आंतून लावून घेतलें होतें. 'सुंदर दार उघड' असें विमलनें म्हटलें पण दार उघडलें गेलें नाहीं.

'सुंदर; अग तुझा पराभव झाला ह्मणून काय झालें? अग खेळांत हें असं चालायचंच. तूं नव्हतीस का इतके दिवस माझा पराभव करीत. उघड दार उघड!' इतकें विमल बोलली तरी पण दार अजूनही उघडेना. हा

सुंदरचा अबोला कितीसा वेळ टिकणार हें विमलला पूर्ण ठाऊक होतें आणि शेवटीं ' अद्यापही दार उघडत नाहीं ' असें पाहून विमल घरीं जाण्यास निघाली. जातां जातां ' बरं आहे ! तूं दार उघडीत नाहींस तर मीही तुझ्या-कडे न येतांच एकटीच फिरावयास जाईन. ' एवढें ह्मणण्यास मात्र विमल विसरली नाहीं.

विलासपुराजवळच एका बाजूस दोन तीन मैलांवर एक टेकडीची रांग पसरली होती. ह्याच बाजूस पुष्कळ लोक फिरावयास येत. साधारण संध्या-काळ झाली कीं लोक आपआपल्या घरीं जाण्यास निघत व नंतर मात्र तो प्रदेश निर्जन व भयाण होई. विमल व सुंदर दोघीही रोज इकडे नियमानें फिरावयास येत. आज मात्र ठरविल्याप्रमाणें सुंदरकडे न जातां विमल एक-टीच फिरावयास निघाली.

---

## प्रकरण २ रें

# यशवन्त व मोहन.

विलासपूरांत ज्या कांहीं मूठभर लोकांची प्रतिष्ठितांत गणना होत असे त्यांतच रावसाहेब देशमूख हे होते. देशमुखांच्या मानमरातबाविषयीं आपणांस चौकशी करण्याचें कारण नाहीं. तरी पण हा पन्नाशी उलटलेला श्रीमान् व सरकारच्या कृपेंतला इसम ब्राह्मणेतर ह्मणून समजल्या जाणाऱ्या एका विवि-क्षित वर्गाचा पुढारी म्हणून गणला जात होता यांत शंका नाहीं. रावसाहेबांनीं आपल्या साऱ्या हयातींत ज्या कांहीं चार दोन चांगल्या गोष्टी केल्या त्यांतली एक किंचित् महत्वाची आहे. ह्यांनीं एका गरीब व होतकरू मुलाला आपल्या घरीं आश्रय दिला होता.

सदरहू मुलगा रावसाहेबांच्या घरीं कोणत्या परिस्थितींत आला होता हें एक गूढच होतें. पण एवढें मात्र खरें कीं, हा नवा मुलगा रावसाहेबांच्या

घरीं आला तेव्हां तो वयानें रावसाहेबांच्या औरस मुलाएवढाच म्हणजे पांच महिन्याचा होता. कोणी म्हणत रावसाहेबांच्या धर्मपत्नीखेरीज अवांतर प्रकरणाचें हें फळ असावें, कोणी म्हणत रावसाहेबांनीं पुढारीपणा पत्करल्यामुळें एका अनाथ अर्भकाला पदरीं आश्रय देऊन त्यांनीं लौकिकाची आयात करण्याची खटपट केली. कांहीं लोकांचा एका निराळ्याच बातमीवर विश्वास होता ते म्हणत रावसाहेब एके रात्रीं कामकाज आटपून घरीं परत येत असतां त्यांना रस्त्यांतच एका बाजूला, पांढऱ्या फडक्यांत कांहींसें गुंडाळून ठेवलेलें दिसलें. फडकें उघडून पहातात तों आंत एक गोजिरवाणें मूल ! रावसाहेबांनीं दयार्द्र अंतःकरणानें तें मूल उचलून आपल्या घरीं नेलें.

तें कांहीं असो पण एवढें मात्र खरें कीं हा अपरिचित नवा मुलगा घरीं आणल्यापासून रावसाहेबांचें नशीबही उर्जितावस्थेंत आलें. त्यांनीं या नव्या पोराचें नांव यशवंत असें ठेविलें. रावसाहेबांच्या एकुलत्या एका औरस मुलाचें नांव मोहन असें होतें. मोहनची आई खरोखरच साध्वी होती. तिनें मोहन व यशवंत ह्या दोघांसही सारख्या तऱ्हेनें वागविलें !

मोहन व यशवंत जसजसे मोठे होऊं लागले तसतसे ते एकमेकांचे स्नेही बनूं लागले. त्यांच्या स्वभावांत मात्र लहानपणापासून जमिनअस्मानचें अंतर होतें. आणि ह्यामुळेंच त्या दोघांची लहानपणची मुग्धमैत्री पुढें तशीच टिकून राहणें शक्य नव्हतें. रावसाहेबांनीं ह्या दोघा मुलांसही शाळेंत घातलें. रावसाहेबांनाही मोहनाप्रमाणेंच यशवंतही आपलाच मुलगा आहे असें वाटे. यशवंत हुषार होता. वर्गांत मास्तरांच्या डावे हातास त्याचा नेहमी नंबर असे. मोहनरावाची बुद्धिमत्ता मात्र फार अगाध होती. केवळ रावसाहेबांचे चिरंजीव म्हणून ह्यांना वरचे वर्गांत ढकलण्यांत येई एवढेंच ! ह्या कारणानेंही मोहन–यशवंताच्या बंधु–भावांत वितुष्ट आलें.

मोहन व यशवंत दोघेही मॅट्रिकच्या परीक्षेपर्यंत बरोबर होते. पण मॅट्रिक-पलीकडे वडिलांच्या नांवाचा वशिला उपयोगी पडण्यासारखा नसल्यामुळें मोहन मॅट्रिकला तीन वेळां नापास झाला, तेवढ्या अवधींत यशवंतानें मात्र बी. ए. पर्यंत मजल मारली. मॅट्रिकच्या परीक्षेंत यशवंत पास होऊन मोहन जेव्हां नापास झाला तेव्हां मात्र त्याच्या वैमनस्यास भडक स्वरूप प्राप्त

झालें. नेहमीं नापास होणाऱ्यांना पास होणाऱ्या मुलांचा हेवा वाटतो यांत कांहीं शंका नाहीं. अलीकडे तर मोहनरावानें परीक्षेचा नादच सोडून दिला होता तो ह्मणे 'मला काय? माझे वडील खूप कमाई करीत आहेत, मग आह्मीं कशाला आपल्यीं त्रास द्याला! तें कांहीं नाहीं आतां अभ्यास बिभ्यास कुच नाहीं; आतां फक्त खाना पीना, और मजा करना!' कोणी जर 'काय मोहनराव हल्लीं काय करतां?' असें विचारलेंच तर 'आहे शिक्षणखात्यांत' असें ह्या ऐटीनें उत्तर देई.

कर्मधर्मसंयोग असा कीं मॅट्रीकच्या परिक्षेंत पहिला टल्ला जेव्हां मिळाला त्याच वर्षी मोहनची साध्वी आई कालवश झाली. यशवंतालाही मातृसुख काय ह्याचा अस्पष्ट कां होईना पण थोडा अनुभव ह्याच मानलेल्या माते-पासून मिळाला होता. तिच्या मृत्युसमयीं यशवंतालाही अत्यंत वाईट वाटलें मोहनाची वर्तणूक मात्र ह्या प्रसंगानंतर पुष्कळच बिघडली. घरांतला वात्स-ल्याचा प्रेमळ दाब नाहींसा झाल्याबरोबर पुष्कळ तरुणांचें वर्तन बिघड-ण्यास प्रारंभ होतो. पण असाच प्रकार यशवंताचे बाबतींत कां होऊं नये हें एक गूढच आहे. कदाचित यशवंताच्या खऱ्या पण अज्ञात मातापितरां-चाही तसा आनुवंशिक गूण असूं शकेल!

ही मानलेली माता मृत्यूमुखीं पडेपर्यंत आपला या देशमूख घराण्याशीं काडीइतकाही संबंध नाहीं ही गोष्ट यशवंतास बिलकूल समजली नव्हती. मोहनाची आई तीच आपलीहि आई असें त्याला वाटे. रावसाहेब देशमूख हेच आपले वडील अशीच त्याची समजूत होती.

पण ही त्याची समजूत, मोहनाची आई मरण पावली त्याच दिवशीं खोटी ठरली. आपल्या पत्नीचा देह वाळवंटीं नेऊन सर्व रीतसर व्यवस्था करून रावसाहेब घरीं परत आले. आतां त्यांना वाईट वाटत असावेंसें दिसत होतें. कदाचित तारुण्यांत केलेल्या अविचारांचेंहि स्मरण होऊन त्यांना पश्चात्ताप होत असेल. देवाब्राह्मणांसमोर विधिपूर्वक पाणिग्रहण केले-ल्या साध्वी पत्नीशींही बेइमान झालों हें आठवूनही कदाचित त्यांना वाईट वाटत असेल. घरीं येतांच यशवंत–मोहनाला जवळ बोलावून ते ह्मणाले, 'बाबांनों, आज जशी ही अचानक गेली तशाच मीही एकादे दिवशीं मरून

जाईन. माझ्यामागें तुह्मांला तुमचें तुह्मीच संभाळलें पाहिजे. बाळ यशवंत, तूं माझा खरा मुलगा नाहींस. असा एकदम चपापून जाऊं नकोस. तुझ्या जन्माचें खरें रहस्य लिहिलेले कागद व माझें मृत्युपत्र मी माझ्या तिजोरींत एकाच पाकिटांत घालून ठेवले आहेत. तें पाकीट मी मेरपर्यंत तुमच्यापैकीं कोणीही फोडतां कामा नये. बाळ मोहना, यशवंत हा तुझा सख्खाच भाऊ असें तूं समज. दोघे प्रेमानें एके ठिकाणीं रहा ह्मणजे झालें. '

रावसाहेबांनीं मुलांना आणखींही पुष्कळ उपदेश केला. नंतर यशवंत व मोहन आपापल्या खोल्यांकडे निघून गेले. आपल्या जन्माचें कांहींतरी गूढ रहस्य आहे हें कळल्यापासून यशवंताला फारच चमत्कारिक वाटूं लागलें. खोलींत जातांच तो बिछान्यावर पडला. मानलेल्या मातेच्या मृत्यूमुळें, व त्यांत अकस्मात कळलेल्या ह्या बातमीमुळें त्याच्या मस्तकांत कल्पनांचा हलकल्लोळ उडून गेला.

' एकूण मी रावसाहेबांचा मुलगा नाहींतर ! अरेरे, एकाद्या पतित स्त्रीच्या अमंगल उदरीं तर माझा जन्म नसेल ना झाला ? तसें जर असेल तर माझ्या...पण नाहीं. तसें असणें शक्य नाहीं. माझी माता अपवित्र असणें शक्य नाहीं...पण मग मी आतां यशवंत देशमूख असें नांव कां म्हणून लावावें ? माझ्या वडलांचे नांव मी आतां कां म्हणून लावूं नये ? तसें जाऊन मी रावसाहेबांना विचारूं का ? पण लहानपणापासून माझें पालन-पोषण केलेल्या त्या महाभागाला ह्या माझ्या प्रश्नानें असह्य दुःख तर नाहीं ना होणार ?........नाहीं. पण हा नांवाचा व लौकिकाचा प्रश्न आहे. पोटाच्या प्रश्नापेक्षां अब्रूचा प्रश्न केव्हांही ज्यास्त महत्वाचा आहे ! '

यशवंत ताडकन् उठला ! दुसऱ्याच क्षणीं तो रावसाहेबांसमोर जाऊन उभा राहिला. ' रावसाहेब, ' यशवंतानें धिटाईनें विचारलें, ' याउप्पर माझें नांव मी काय लावूं ! ' हा प्रश्न ऐकतांच रावसाहेब क्षणभर चपापले. नंतर किंचित हंसून ते ह्मणाले यशवंता ! असा प्रश्न तू विचारावास हें अगदीं स्वाभाविक आहे. जा बाळ तूं आत्तांपर्यंत लावीत आलास तसेंच यशवंत माधवराव देशमूख असेंच नांव लाव ! यांत एक अक्षरही खोटें नाहीं. जा.'

यशवंत खालींत पुन्हां परत आला त्याच्या डोक्यांत कल्पनेचीं फुलपांखरें पूर्ववत् घिरट्या घालूं लागलीं. ' रावसाहेबांनीं मला हेंच

नांव कायम ठेवण्यास कां बरें सांगावें ? कदाचित ते माझी फसवणुक तर करीत नाहींना ? कदाचित मी ह्मणजे रावसाहेबांच्याच पापकृत्याचें फळ नसेन ना ! ' हा कठोर विचार मनांत येतांच क्षणभर त्याचें अंग थरारलें. ' छेः छेः ! माझ्या प्राणदात्याविषयीं असा संशय माझ्या मनांत आला तरी कसा...... ' विचार करतां करतांच यशवंत झोपी गेला.

' यशवंत हा आपला भाऊ नव्हे ' ही बातमी कळतांच मोहनला समाधान वाटलें. खोलींत जातांच त्याची निराळीच विचारसरणी सुरू झाली. 'रावसाहेबांचें आतां बरेंच वय झालेलें आहे, तेव्हां त्यांचा कांहीं नेम नाहीं. पण बहुतेक त्यांनीं त्या यशवंत्यालाही इस्टेटीचा अर्धा वारसदार केला असेल तें कांहीं नाहीं रावसाहेब जगोत वा मरोत मला अगोदर यशवंताच्या जन्माचें गूढ व मृत्युपत्र ठेवलेलें तें पाकीट हस्तगत करून घेतलें पाहिजे. त्याच्या त्या जन्म–रहस्यावरून तो माझा भाऊ नाहीं हें तर सिद्धच होईल आणि त्या मृत्युपत्रांत रावसाहेबांनीं यशवंतालाही इस्टेटीचा वांटेकरी केला असेल तर त्या मृत्युपत्राचाच निकाल केला ह्मणजे झालें. थांब यशवंत्या ! रावसाहेबांनीं ' राम ' ह्मटला कीं तुला देशोधडीला लावला ह्मणून समज ' हा विचार मनांत येतांच मोहननें एक विकट हास्य केलें.

तेवढ्यांत त्याची नजर खिडकीबाहेर गेली. रस्त्यांतून विलासपूरच्या मुलींच्या शाळेतल्या कांहीं मुली चालल्या होत्या. बऱ्याच ब्राह्मण कुमारिका असून कांहीं त्यांतल्या अन्य जातीयही होत्या. ह्या मुली पाहतांच उल्लू मोहन खिडकीजवळ येउन मुद्दामच खांकरला. हेतू हा कीं त्यांतल्या कांहीं-जणींनीं तरी याच्याकडे पहावें !

अरेरे ! तरुणांच्या मनाची एवढी अधोगती व्हावी ना ? पतित विचाराचे नादान ब्रह्मचारी म्हणजे उदयोन्मुख राष्ट्राच्या नरडीवर बसलेलीं सैतानी पिशाच्चेंच नव्हत काय ? ' मी ब्रह्मचारी ' ' मी ब्रह्मचारी ' असा बाष्कळ टेंभा मिरवून, आल्यागेल्या पवित्र आयाबहिणींकडे पापी नजर टाकणारे हे नादान नरपशु समाजाचा एका क्षणांत अधःपात करून टाकतील ! खरोखर ' स्त्री ' हा जातिधर्माचा प्रश्नच नव्हे. पवित्र स्त्री मग ती ब्राह्मण असो किंवा ब्राह्मणेतर असो, हिंदु असो वा मुसलमान असो, ती रस्ते झाडणारी महारीण

असो की रस्ताधारी सम्राटाची पट्टराणी असो, ती केव्हांही, कुणालाही वंदनीयच असली पाहिजे. अशा नियमावरच समाजाची काय किंवा राष्ट्राची काय उभारणी होत असते; आणि ह्या पवित्र नियमाचें उल्लंघन झालें की त्या समाजाच्या अधःपात व्हावयास सुरवात झाली ह्मणून खुशाल समजावें. 'गांव तेथें महारवाडा' ही गोष्ट तर खरीच आणि म्हणूनच आमच्या अभागी भारतभूमीवर नादान संभावित सैतान नसतातच असें ह्मणणें खरोखर धाडसाचें होईल. पण त्यांतल्या त्यांत आनंदाची व अभिमानाची गोष्ट ही की पावित्र्याच्या बाबतींत आमचा हिंदुस्थान इतर कोणत्याही राष्ट्रापेक्षां खास श्रेष्ठ आहे. मिस मेयोसारखे वाचकळ टीकाकार काय वाटेल तें बरळोत पण एवढें खास की, आमच्या आर्यावर्ताच्या उज्वल पावित्र्याचें निशाण अखंड आणि त्रिखंड फडकत राहणार! आमच्या हिंदमातेचा लौकिकच असा तेजस्वी आहे. तिचा इतिहासच असा तडफदार आहे. पण असें जरी आहे तरी आपल्या समाजांतल्या मूठभर सैतानांची हयगय करणें केव्हांहि योग्य होणार नाहीं. पवित्र अबलांच्या अब्रूवर दरवडा घालणाऱ्या अशा निमकहराम सैतानांना वेळींच ठेंचून टाकलें पाहिजे.

रस्त्यांतल्या त्या मुली दृष्टीस पडतांच मोहनच्या पापी विचारांना जास्तच चालना मिळाली. मोहन आपणाला सत्यशोधक म्हणवीत असे. पण दुर्दैवानें सत्यशोधकाचा एकही चांगला गूण ह्या नंदीबैलाच्या अंगांत नव्हता. ब्राह्मणाला शिव्या दे, व ब्राह्मणांच्या पोरीवर वाईट नजर ठेव' एवढ्या दोनच —खऱ्या सत्यशोधकाला कधींही न आवडणाऱ्या—गोष्टी त्याला आवडत. रस्त्यांतल्या कुमारिकांना पाहून ह्याला काय वाटलें तें लिहून दाखविण्यास आमची लेखणी असमर्थ आहे.

मोहनासारख्या कर्मभ्रष्ट चांडाळाला जर 'सत्यशोधक' ह्मटलें तर सत्यशोधक ह्या पवित्र शब्दाचा उपमर्द नाहीं का होणार? खास होईल.

'यशवंत आपला भाऊ नाहीं' ह्या बातमीचा मोहननें दुसऱ्याच दिवशीं उपयोग केला. तो आतां यशवंताचा पुरा वैरी बनला होता. आईच्या मृत्यूचे दुसरे दिवशीं हा वेळेच यशवंताच्या खोलींत गेला. आदले दिवशीं घडलेल्या प्रकारानें यशवंत जरा खिन्नच दिसत होता.

'काय! यशवंतराव!' मोहननें कुत्सितपणें प्रश्न केला 'आपण बिन-आईबापाचे आहांत हें तर आतां खरें ना?' यशवंतानें हे शब्द ऐकले. तें त्याच्या जिव्हारी लागले, तो संतापला रागानें लाल झाला. मोठ्या आवेशानें तो ताडकन् उठला. आतां हा मोहनाच्या नरडीचा घोंट घेतो कीं काय असें कोणालाही वाटलें असतें. हें त्याचें उग्र स्वरूप पाहतांच पापी मोहनाची घाबरगुंडी उडाली त्याचें हातपाय लटपटूं लागले. पण यशवंत विचारी होता. त्यानें क्षणांत आत्मसंयमन केलें. मोहन कसाही असो पण तो आपल्या अन्नदात्याचा मुलगा आहे ही गोष्ट यशवंत केव्हांही विसरला नाहीं. यशवंत आपल्याला मारीत नाहीं, अशी खात्री झाल्यावर मोहनाची भित्री जीभ फार लवलव करूं लागली! 'मार कीं मार! असा डरतोस कां? बिनबापाची पोरें अशींच भित्रीं असायचीं! असेल ताकत तर ये की' इत्यादि वाक्यें तो आतां धिटाईनें बडबडूं लागला. पण 'आपल्या अन्नदात्याच्या मुलाविरुद्ध आपण कांहींही करणें बरें नव्हे' असा उदार यशवंताचा निश्चयच झाला होता!!

---

## प्रकरण ३ रें.

# रंगेल मित्र.

पहिल्या प्रकरणांत वर्णन केलेला प्रसंग ज्यावेळीं घडून येत होता त्यावेळीं मोहनराव आपल्या एका परमस्नेह्याच्या माडीवर मौज करीत होता. 'समान शीले व्यसनेषु सख्यम्' या न्यायानें मोहनरावाचे जिवलग मित्रही थेट त्याच्यासारखेच होते. ज्याच्या माडीवर ह्या नादान मित्रांचा अड्डा भरे तो सर्जेराव म्हणजे सर्व व्यसनांचें माहेरघर होतें. सर्जेरावानें इंग्रजी पांचव्या यत्तापासून शाळेला रामराम ठोकला होता. त्याच्या घरीं त्याची फक्त आई होती. तिची हा प्राणी नित्यनेमानें गांजणूक करी. मोहनरावांचे वडील म्हणजे रावसाहेब अद्याप जिवंत असलेमुळें ह्या मित्रांच्या बैठकी मोहनाचे घरीं भरणें

अशक्य होतें. तिसरा मित्र नान्या हा एका सिनेमा कंपनींत नौकरीस होता. मोहन, सर्जेराव व नान्या ही तिकल उडाणटप्पूंची सोनेरी टोळी होती म्हटलें तरी चालेल.

सर्जेरावाची माडी म्हणजे एक विलासी स्त्रियांच्या कामुक व नखरेल छायाचित्रांचें उनाड प्रदर्शन होतें. माडीच्या रंगाबरोबरच सर्जेरावाची वडिलोपार्जित इस्टेटही उडून जात होती. मोहन आला त्यावेळीं सर्जेराव सिगारेट ओढत बसले होते.

'काय सर्जा नान्या आला कीं नाहीं ?'

'नाहीं आला रे अजून.'

'बसला असेल त्या अंबीकडेच झालें !' टोपी टेबलावर फेंकतां फेंकतां मोहनरावांची स्वारी उद्गारली. नंतर खिशांतून एक वर्तमानपत्र बाहेर काढून मोहनराव बैठकीवर लवंडले. मोहन वर्तमानपत्र वाचतो आहे हा प्रकार पाहून सर्जेरावालाही मौज वाटली असावी. तो लगेच म्हणाला, 'अरे वा, मोहन्या, आज अगदीं वाचन चालवलं आहेस ? अरे वाचन कसलंरे लेका घेऊन बसला आहेस. पण हें पहा ह्या पत्रांतून बायकांनीं नवऱ्यांना दिलेल्या ......नाहींतर मी गंधर्वांचा दुसरा नवरा करीन...अशा अर्थाच्या नोटिसा वाचण्यांत मला फार आनंद होतो. पहा पहा ही एक वाचून तर पहा !' असें म्हणून मोहनानें हातातलें वर्तमानपत्र सर्जाच्या हातीं दिलें.

सर्जाला इंग्रजी चौथी यत्ता शिकून आतां बरींच वर्षे लोटलीं होतीं आणि त्यामुळेंच बोंगडीसारखें त्याचें वाचन वाढवलें होतें. प्रथम तर त्यांनीं मोहनानें दिलेलें वर्तमानपत्र उलटेंच हातांत धरलें, नंतर मोहनाच्या सूचनेवरून पत्र सरळ धरून सर्जानें ती नोटीस वाचण्यास प्रारंभ केला. मजकूर वाचण्यास जरी त्याला मनस्वी त्रास पडला तरी त्यांतला अर्थ सर्जाला कळला असावा कारण नाहीं तर त्यानें तें पत्र बाजूस फेंकून 'शाबास रे पठ्ठी' असें उद्गार काढलेच नसते. 'मोहन्या अशीं पत्रें मला देत जा बुवा वाचायला' अशीही त्यानें मोहनास विनंति केली.

सर्जानें टाकून दिलेलें पत्र मोहनानें पुन्हां हातांत घेतलें व तो तें वाचूं लागला. तेवढ्यांत एक वयोवृद्ध बाई आंत डोकावली; ती सर्जाची आई

होती. तिला पाहतांच सर्जाचें मस्तक फिरलें 'काय ग ए थेरडे' असे उद्गार त्याच्या अमंगल थोबाडांतून बाहेर पडले.

खरोखर जन्मदात्या मातेची अवहेलना करणारें थोबाड फाटक्या जोड्यानें जरी सडकलें तरी ती फारच सौम्य शिक्षा होईल. जन्मदात्री माता स्वर्गांतली देवता असते. नाना तऱ्हेच्या हालअपेष्टा सोसून नाना तऱ्हेचे काबाडकष्ट करून ती साध्वी स्त्री आपल्या चिमण्या अर्भकाचा जगाला माणूस करून दाखविते. अशा देवतास्वरूप मातेच्या पुण्यमय पायांचें नम्र दर्शन घेतांच साता जन्मींचीं पातकें एका निमिषांत पार धुवून जातील. 'माता' हाच परमेश्वर आहे. 'आई' हाच मर्त्य भूमीवरील स्वर्ग आहे आणि अशा मंगल देवतेची सेवा म्हणजेच देवाधिदेवाची सेवा करणें आहे. परमेश्वर ही कांहीं निराळी व्यक्ति नाहीं. मांगल्याची सेवा हाच मूर्तीमंत परमेश्वर आहे. मग अशा परमेश्वरस्वरूप मातेची अवहेलना करणाऱ्या डुकराचें पाप किती नीच कोटींतलें असेल बरें ? पण हें सध्या उन्मत्त झालेल्या मदांध नेत्रांना दिसावें कसें ? पापाच्या खाणींत वावरणाऱ्या सर्जेरावासारख्या पापाच्या पुतळ्यांना ही गोष्ट पटावी कशी ?

'कायग ए थरडे !' हे सर्जाचे शब्द त्याच्या आईनें ऐकले. तिला असे शब्द प्रत्यदिन ऐकावे लागत तरी पण हे शब्द ऐकतांच तिच्या डोळ्यांत आंसवें उभीं राहिलीं. नवरा मेल्यावर तिला सुखाचा एकही शब्द कधीं लाभला नव्हता. ती अहर्निश देवाजवळ मृत्यूची धूळभेट मागत होती. पण परमेश्वराच्या कोपामुळें ह्मणा अगर अन्य कोणत्या कारणामुळें ह्मणा तिला जिवंतपणीं मरणाचा अनुभव घ्यावा लागत होता. आज सकाळपासून ती उपाशी होती, घरांत खरोखरच तांदुळाचा दाणा नव्हता. एके काळीं दारांतल्या कुत्र्यांपुढें भातपोळीचें ताट ठेवणाऱ्या ह्या माउलीला अलीकडे शिळ्या भाकरींचा घांसही महाग झाला होता. सर्जाची लहर लागलीच तर तो चार आठ दिवशीं तिला चार दोन आणे देई. ते घेऊन जिचें पवित्र नखहि एकेकाळीं कोणाच्या दृष्टीस पडलें नसतें अशा त्या स्त्रीला बाजारांत जाऊन डाळ तांदूळ विकत आणावी लागे. बरें ! ह्या चार दोन आण्याच्या भांडवलावर शिवा तरी कितीसा मिळणार ! तो तेव्हांच संपून जाई व नाइलाज ह्मणून ही

दीनवाण्या मुद्रेनें मुलाजवळ याचना करी. मुलानेंसुद्धां इस्टेट बरीच संपुष्टांत आणली होती. व्यसनाधीन माणसाजवळ पैसा फार दिवस टिकून राहणें अशक्य असतें !

आईच्या डोळ्यांतून अश्रू पदरीं गळाल्याचें सर्जानें पाहिलें नाहीं असें नाहीं, पण त्यामुळें त्याच्या पाषाण हृदयावर यत्किंचितही परिणाम झाला नाहीं, उलट त्याच्या जिभेला प्रोत्साहनच मिळालें.

'म्हातारडे ! तुला माझं सुख पहावत नाहीं म्हणून अशी रडतेस होय ! चल जा खालीं. मला हें तुझं अपशकुनी तोंड दाखवूं नकोस ! चल हो चालती !

' अरे घरांत तांदूळ नाहींत आज. '

' मग जा भीक मागून आण कुठून तरी अन् ला ! तुह्मांला जन्मभर पोसायचा मक्ता घेतला आहे काय आम्हीं. '

म्हातारी रडत रडत खालीं निघून गेली. सर्जेराव पुन्हां धूर सोडूं लागला. म्हातारी खालीं गेली—तत्क्षणींच मोहन ह्मणाला, ' कायरे सर्जा, तूं अगदीं अशीं सडेतोड उत्तरें कशीं देतोसरे ? '

' काय कुणाच्या बापाची भीति आहे कीं काय मला ? ' सर्जानें उत्तर दिलें. '

' नव्हे तसं नव्हे रे ' मोहन ह्मणाला, ' पण मला तर बुवा आमच्या रावसाहेबांपुढें एक अक्षर बोलण्याची भीति वाटते ! '

' या तुझ्या ' सर्जा मोहनाला समजावून सांगूं लागला. ' भित्रेपणामुळेंच सारें बिघडतें. अरे बाप झाला म्हणून काय झालें ? आणि त्याची भीति वाटायचेंरे काय कारण ? तुला समजत नाहीं तें हेंच, आणि ह्या तुझ्या भित्रेपणामुळेंच तुझा तो बिनबापाचा यशवंत चढून बसला आहे झालं ! काय लेकाचा ऐट मारतो, त्याला वाटतं कीं, आतां मी बी. ए. होणार. पण गाढवाला ह्मणावं कीं, बेट्या तुझ्यासारख्या छपन्न बी. ए. नां आमच्या-सारख्यांची सर नाहीं यायची. '

सर्जा एवढें बोलतो न बोलतो तोंच त्यांचा मित्र रंगेल नान्या खोलींत आला. रंगेल नान्या हा सर्जेराव व मोहन यांचाच दोस्त असल्यामुळें त्याचें निराळें वर्णन करण्याचें कारण नाहीं. तो येतांक्षणींच मोहन लडिवाळ स्व-

रानें म्हणाला, 'आईये मेरी प्यारी! आज तुला त्या अंबीनें लवकर सोडलें नाहीं वाटतें!'

नाना त्या सिनेमा कंपनींत नोकरीस होता, तींत अंबू या नांवाच्या एका कमअस्सल स्त्रीचें बरेंच महत्त्व होतें. ती काम असें तसेंच करी. तथापि तिच्यापेक्षां सरस काम करणारी नटी थोडक्या पगारांत मिळणें कठीण असल्यामुळें त्या कंपनीच्या अडलेल्या मालकाला तिचे पाय धरावे लागत. ह्या स्त्रीनें मालकासकट आणखीं इतर नटांनाही आपल्या विषारी जाळ्यांत अडकाविलें होतें. नान्या अशा दुर्दैवी प्राण्यांपैकींच एक होता. सर्जा व मोहन यांनीहि नान्याच्यातर्फे आपआपला वशिला अंबूकडे लावण्याचा प्रयत्न चालविला होता.

सिनेमा कंपनी म्हटली कीं त्यांत असा कांहीं तरी प्रकार असावयाचाच. अगोदर अशा कंपन्यांतून उच्च वर्णीय नट नटी मिळणें कठीण, किंबहुना अशक्यच असतें. त्यामुळें साहजिकच रंगेल बाजारबसव्यांचा अशा कंपन्यांतून भरणा करावा लागतो, आणि साहजिकच थोडक्याच काळांत ती सिनेमा कंपनी म्हणजे एक रंगेलखाना बनूं लागतो. अशा सिनेमा कंपन्या नसल्या तरच फार उत्तम होईल. साळसूद व्यभिचारी लीलांचे हे अड्डे म्हणजे मूर्तिमंत पापाच्या खाणी होत. आणि अशा ह्या बाजारबसव्या, सीतामाई, तारामती इत्यादि वंदनीय देवतांच्या भूमिका करून आम्हांला सद्वर्तनाचा धडा देणार! आणि असा उपदेश समाज–सुधारणा कितपत घडवून आणील हें उघडच आहे. नाटक कंपनी काय किंवा सिनेमा कंपनी काय, तींत असणाऱ्या नट नटी सद्वर्तनी असणें फार अवश्य आहे!

'अरे कसली अंबू न् कसली काय! आज कामच फार लांबलें म्हणून आज एका मुलीवर छापा घालायचा होता छापा' नान्याचें हें बोलणें ऐकून सर्जा, मोहन रंगांत आले. कुठल्याही मुलीबद्दल गोष्ट निघाली कीं हे लागलीच कान टवकारीत. नंतर नान्यानें त्या दिवशीं कोणत्या प्रसंगाची फिल्म घेतली त्याचें रसभरीत वर्णन केलें. तें वर्णन ऐकून मोहनाच्या सुपीक डोक्यांतून एक निराळीच शक्कल निघाली.

'तें कांहीं नाहीं' तो म्हणाला 'सर्जा, नान्या! आपणही असेंच कांहीं तरी केलें पाहिजे. सर्जा! नान्यानें सांगितलेला हा सिनेमांतला प्रसंग ऐकून

मला एक विचार सुचला आहे बुवा ! हें बघ आज सायंकाळीं आपण टेंक-डीवर फिरावयास जाऊं. तिकडे पुष्कळ मुली फिरावयास येतात. अन् त्यांतल्या ह्या नान्याच्या अंबीपेक्षां कितीतरी सुरेख असतात. अशाच एकी-वर आपणही छापा घालूं न काय ! चल आहे तयारी ?' मोहनाच्या विषय-लोलुप टाळक्यांतली ही युक्ति बाकीच्या दोन दोस्तांना पटली. सर्जानें तर त्याला एक छोटी पुस्तीही जोडली. ' हें बघ ' तो म्हणाला ' पोरगीही एकादी भटाचीच असली तर पाहूं. अरे या भटुरग्यांचीं नाकें ठेचलीं पाहिजेत. आज चांगली ब्राह्मणाची पोरच आणूं उडवून ! '

हा भयंकर विचार असा एकाएकीं त्यांच्या मनांत आला व त्याप्रमाणें वागण्याचाही त्या नराधमांनीं निश्चय केला.

पण हा विचार खऱ्या सत्यशोधकाला प्राणांतीं तरी पसंत पडेल काय ? ब्राह्मणाच्या काय किंवा ब्राह्मणेतराच्या मुली काय, त्यांजवर छापा घालणें ह्यासारखें नीच कृत्य दुसरें कोणतें असूं शकेल ? नाहीं. पुण्यमय रक्ताच्या जातिवंताला हा असा दुष्ट विचार कधींही सुचणार नाहीं. उलट असले प्रकार ऐकून खऱ्या सत्यशोधकाचे तेजोमय डोळे संतापानें लाल झाल्यावांचून कसे राहतील ? असा दुष्ट विचार नान्या, मोहन, सर्जा अशांसारख्या मर्कटांनाच सुचावयाचा ! ते आपणांस सत्यशोधक म्हणवीत होते खरे; पण 'सत्यशोधक' ही पदवी अशा नरपशूंना बहाल करण्यास आमची लेखणी धजावत नाहीं. खऱ्या सत्यशोधकाला ब्राह्मण-स्त्री अगर ब्राह्मणेतर-स्त्री मातेसमान पूज्य असते.

तो भयंकर विचार ठरवितांच प्रथम सर्जानें कपाटांतली बाटली बाहेर काढली, नंतर तिघांनीं मनसोक्त सुरापान केलें.

' सर्जा ' मोहन बडबडूं लागला, ' जातांना व्हिक्टोरियांत बसून जाऊं. अशी सुंदर पोर गाठूं म्हणतोस कीं बस ! आज आपण या बामणांची चांगली खोडकी जिरवूं, शाबास आहे साली ! काय नान्या खरं कीं नाहीं ? '

' बरोबर आहे अगदीं खरं आहे ' नान्याजी बोलते झाले. अशा रीतीनें आपल्या पापी विचाराला ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादाचें पांघरूण घालून हे तिघे सैतान घराबाहेर पडले, नंतर व्हिक्टोरिया करून विलासपुराजवळच एका बाजूला असलेल्या टेंकडीचा रस्ता त्यांनीं धरला !

अरेरे ! कुमारिकांच्या कौमार्यावर, पतिव्रतांच्या पातिव्रत्यावर राजरोस दरवडा घालणारे संभावित सोदे म्हणजे जिवंत पिशाच्चेंच आहेत. अशा सोद्यांना लाथेखालीं तुडविण्यांतच समाजाचा उद्धार आहे. पुण्यामुंबईत असले लुटारू हरहमेष दृष्टीस पडतात. नवरा नौकरीवर गेला कीं हे निकामी सैतान, त्या बिचाऱ्या पत्नीभोंवतीं विषारी वासनेचें जाळें टाकण्यास सुरवात करतात. निष्कलंक तरुणी कामानिमित्त वा अन्य कारणानें म्हणा घराबाहेर पडल्या कीं लागलीच हे संभावित टोणगे आपली दुष्ट मोहिनी त्या अबलांवर फेंकूं लागतात. पोटासाठीं नाइलाज म्हणून स्त्रिया गिरण्यांत, शाळेंत अगर अशाच इतर ठिकाणीं कामासाठीं जाऊं लागल्या कीं तत्क्षणींच अधिकारी पशू त्या असहाय्य गायींची गांजणूक करूं लागतात ! पोटासाठीं कितीतरी तरुणींना आपल्या अब्रूचा होम करावा लागतो. हे प्रकार समाजाच्या चालत्या गाड्याला भयंकर अडथळे करतात, आणि म्हणूनच प्रत्येक समाजसुधारकानें, सुशिक्षितपणाच्या पांघरूणाखालीं वावरणाऱ्या ह्या कामुक गाढवांना उजेडांत आणलें पाहिजे. प्रत्येक लेखकानें समाजांतल्या ह्या पापांची खोडकी जिरवण्यासाठीं आपापल्या लेखण्या सरसावल्या पाहिजेत. प्रत्येक सत्यशोधकानें असत्याचें खंडन करण्यासाठीं जिवापाड श्रम केले पाहिजेत. प्रत्येक सत्यशोधकानें ब्राह्मणांच्या घेरीं पळविण्यांतच सर्वस्व समजणाऱ्या नादान निमकहरामांची वेळींच पायमल्ली केली पाहिजे ! अशानेंच समाज सुधारत असतो. प्रत्येक स्त्रीचें, मग ती चांभार असो, महार असो, ब्राह्मण असो वा मराठा असो, जातिवंत सत्यशोधकानें संरक्षण केलें पाहिजे.

---

## प्रकरण चवथें.

# अत्याचार !

विलासपूरची टेंकडी म्हणजे फिरावयास जाण्याचें एक सुंदर ठिकाण असे. सायंकाळीं ह्या ठिकाणीं गार वारा फारच मौज उडवून देई. दिवसभर श्रमलेले किंवा केवळ चैन करण्यासाठीं म्हणून आलेले पुष्कळ लोक इकडे येत.

टेकडीवर सुंदरशी बाग केलेली असून तींत बसण्यासाठीं पुष्कळ बाकें ठेव-लेलीं होतीं. साधारण संध्याकाळ झाली म्हणजे ही सर्व बाकें भरून जात. मात्र माणसांची रहदारी रात्रीं साडेसातापर्यंतच असे. पुढें मात्र जो तो आपआपल्या घरीं जाई व जिकडे तिकडे शुकशुकाट होऊन जाई.

नाना प्रकारचे लोक इकडे फिरावयास येत हें वर सांगितलेंच आहे. कॉले-जांतल्या मुली इकडेच फिरावयास येत असल्यामुळें साहाजिकच विद्यार्थीही इकडे येत. बरेच विद्यार्थ्यांना विद्यार्थीनींशीं बोलण चालणें करण्यास हेंच स्थळ योग्य वाटे. ज्या तरुण विद्यार्थ्यांना केवळ मुलींशीं संभाषण करण्यांत मोठेपणा वाटे ते मुद्दामच कांहीं ना कांहीं कारण काढून आपल्या जिवाची पर्वणी साधून घेत. एखाद्या मुलीचा हातरुमाल खालीं पडतांच असे तरुण वानरासारखी टुणकन् उडी मारून, तो रुमाल उचलून त्या तरुणीच्या हातीं देत. कित्येक तरुणी कित्येक वेळां मुद्दामच हातरुमाल खालीं टाकीत. कांहीं कांहीं तरुणांना आपली ओळख अमक्या अमक्या मुलीशीं आहे हें दुसऱ्यांना दाखविण्यांत फार अभिमान वाटतो. ते एखाद्या मुलीशीं कांहीं तरी बोल-तात व त्याच वेळीं मागून येणाऱ्या मित्रांकडे मोठ्या दिमाखानें पाहतात. अशा लोकांचा तर इकडे फार मोठा भरणा होता.

टेकडीवर ठिकठिकाणीं विद्यार्थी व विद्यार्थीनी, एकत्र अगर निरनिराळा गट करून बसत. अशा ठिकाणीं नाना तऱ्हेच्या गप्पागोष्टी चालत. पण बहुधा विद्यार्थ्यांची कॉलेजांतल्या मुलींबद्दल चर्चा चाले. कोणी आचरट, आपली एका विद्यार्थीनीशी ओळख आहे हें दाखविण्याठीं ' हें पहा, आज आज माझें हें धोतर त्या गोदूताईनीं शिवून दिलें. ' अगर ' छे बुवा ! ती रत्नावती तर फार बोल्ड आहे. आज तिनें मला चहाला बोलावलें आहे. ' अशा प्रकारच्या खोट्या विधानेंहि खुशाल ठोकून देत. कांहीं पांचट विद्यार्थी ' कां रे विन्या ! आज ती शांती वर्गांतून मध्येंच कां रे उठून गेली ? ' किंवा ' काय रे त्या अमक्या प्रोफेसरानें तमकीची वही अगदीं खोलींत बोलावून कां रे तपासली ? ' अशा प्रकारचे चटोर पण सूचक प्रश्न विचारीत.

मुलींच्या संघांतून कांहीं कमी बाष्कळ विनोद चाले असें नाहीं तरी पण त्यांचा विनोद विद्यार्थ्यांच्या बाष्कळ प्रलापांपेक्षां बराच सौम्य असतो यांत

शकत नाहीं. कॉलेजांत मुली गेल्या म्हणजे त्यांना कोणत्या ना कोणत्या कारणानें कां होईना पण स्वातंत्र्य मिळतें. स्वातंत्र्याबरोबर धिटाई उत्पन्न होऊन कित्येक वेळां नादान तरुणांची संगत लागून बऱ्याच तरुणी वांकड्या मार्गानें जाण्याचा संभव असतो. मुलामुलींच्या एकत्र शिक्षणाचा मुख्य दोष हाच आहे. तथापि असे मोहाचे प्रसंग झुगारून देऊन कित्येक तरुणी धिटाईनें व घडाडीनें आपला शिक्षणक्रम पुरा करतातच.

आपली विमल, सुंदर अशांसारख्या सुशिक्षित तरुणी आज काल कांहीं दुर्मीळ आहेत असें नाहीं.

विमल आज सुंदरकडे न जातां एकटीच फिरावयास निघाली. आजचा तिचा थाटही नेहमींप्रमाणेंच होता. तिच्या पायांत उंच टांचांचे बूट असून अंबाड्यावर कुंद–कळ्यांची तांबुस वेणी होती. आज तिनें पिंगपॉंगच्या साम-न्यांत सुंदरचा पराभव केला होता. असाध्य असलेली गोष्ट साध्य झाली म्हणजे आनंद होणें हा मनुष्यधर्मच आहे. परंतु ह्या विजयाबरोबरच ‘ आज सुंदर आपलेबरोबर फिरावयास आली नाहीं ’ हा विचार मनांत येऊन विम-लला किंचित वाईट वाटत होतें. ती एकटी अशी फार थोडे वेळां ह्या बाजूस आली होती, हरहमेष सुन्दर तिच्या बरोबर येई. सुन्दर बरोबर असली म्हणजे सुखमय वाटणारें फिरणें आज ती नसल्यामुळें विमलला बरोबर वाटलें नाहीं, आपल्याबरोबर नेहमीं वावरणारीं माणसें एकादे दिवशीं गैरहजर असलीं कीं असेंच चुकल्याचुकल्यासारखें होतें.

विमल विलासपूरच्या टेंकडीवर गेली तेव्हां सारीं बाकें च्चिकार भरून गेलीं होतीं. तेव्हां साहजिकच पुढें जाऊन ही एका बाजूस असलेल्या एका झाडाखालीं जाऊन बसली. आज गप्पागोष्टी करण्यास तिच्याबरोबर कोणी नव्हतें तेव्हां साहजिकच तिला गंभीर विचार सुचूं लागले.

आज नव्या नवलाईचा लग्नाचा विचार तिच्या मस्तकांत प्रथमच आला. तिच्या एका जुन्या मैत्रिणीचें सुमारें एक वर्षापूर्वी लग्न झालें होतें त्याची तिला आठवण झाली. दुर्दैवानें त्या मैत्रिणीचा नवरा विलायतेस गेला होता तो तिकडेच रंगून राहिला होता.

खरोखर विमलेच्या काल्पनिक वातावरणांत पांखरें उड्या मारूं लागलीं. ‘ असें लग्न करण्यापेक्षां जन्मभर कुमारिका राहणें चांगलें नव्हे काय ? पण

सगळ्यांचे नशीब असेंच असेल कशावरून? माझ्या नशिबानें मला एकादा प्रेमळ जिवलग सोबती मिळणार नाहीं कशावरून? पण, शिक्षण घेऊन, लग्न करून केवळ संसार करणें हें एकच कां आमचें ध्येय असावें? समाज–सेवा वा राष्ट्रसेवा आम्हांस करतां येणें अशक्य का आहे! संसार सुरळीत करून सुद्धां लोकजागृतीचें काम करणें अवश्य नाहीं का? परमपूज्य रमाबाईसाहेब देवतारूप अहिल्याबाई यांनीं आपल्या संसाराबरोबरच देशसेवा केली नाहीं का? मग आम्हां तरुणींना तें अशक्य का वाटावें? लग्न लागल्याबरोबर केवळ संसार हेंच आमचे सर्वस्व कां व्हावे? अलीकडे कितीतरी सुशिक्षित तरुणी बी. ए. एम. ए. झाल्यावर लग्न करून एकदम कुठें तरी गडप होतात असें कां व्हावें? आम्ही तरुणी म्हणजे आमच्या असहाय्य भारत–भूमीच्या कोणीच का नव्हत! स्त्रियांनीं संसार करावा हें तर खरेंच पण त्या बरोबरच त्यांनीं समाज–सेवा करणें फार उत्तम. हें अशक्य नाहीं, हें शक्य आहे असें इतिहास सांगत आहे हें शक्य आहे. असें हल्लींचा सुधारलेला काळही सांगू शकेल.'

विमलेच्या डोक्यांत आलेले हे विचार खरोखर विचार करण्यासारखे आहेत. अलीकडे पाश्चात्य स्त्रियांचें अनुकरण करण्याची घातुक चाल आमच्या दरिद्री हिंद मातेच्या सुकन्यांना जडूं लागली आहे हें देशाचें दुर्दैव होय! आज पाश्चात्यांच्या नकली वेषाचें अनुकरण करणें घातुक तितकेंच फार खर्चाचे काम आहे. अलीकडे तर मुंबईसारख्या प्रसिद्ध शहरीं स्त्रिया विजेची वेणी वापरूं लागल्या आहेत. ही वेणी लहान लहान दिव्यांची केलेली असून बॅटरीची डबी पोलक्याच्या खिशांत ठवावयाची असते. काय हा नकली डामडौल! दरिद्री हिंदुस्थानला अशा सुधारणेची काडीमात्र जरूरी नाहीं. अत्यंत दुःखाची गोष्ट ही कीं, पाश्चात्य स्त्रियांची धडाडी मात्र आमचे स्त्रियांना पटत नाहीं. पण धडाडीसाठीं सुद्धां किंबहुना कुठल्याही गुणासाठीं आर्यावर्तातील भगिनींना दुसऱ्या कोणत्याही देशाकडे आशाळभूत दृष्टी लाव-ण्याचें कारण नाहीं. साध्वी जिजाई, पुण्यस्वरूप द्रोपदी, शूर अहिल्याबाई, रणरागिणी लक्ष्मीबाई इत्यादि देवता याच आमच्या हिंदमातेचें जिवंत सौभाग्य आहेत. आणि अशा उज्वल पण कमनशिबी देशांत जन्म घेणाऱ्या

स्त्रियांना वंदनीय व अनुकरणीय चरित्रें दुर्मिळ असतील तरी कशी ? पाश्चात्य स्त्रियांचें अयोग्य अनुकरण करण्याची सवय जर इकडेहि फैलावली तर दरिद्री कमनशिबी हिंदुस्थाना ! तुझा इतिहास लवकरच संपेल ! !

पण असें होणें अशक्य आहे भरतभूमीची कन्यारत्नें इतक्या अधोगतीस केव्हांही जाणार नाहींत. आजपर्यंतची परंपरा अशी स्पष्ट ग्वाही देत आहे कीं हिंदकन्या चुकतील पण केव्हांही फसणार नाहींत ! ! पाश्चात्य स्त्रियांच्या उडाणटप्पू डामडौलाचें अनुकरण करण्याची सांथ जरी तूर्त पसरत आहे, तरी ती लवकरच खात्रीनें नाहींशी होईल. लोकमान्य स्वदेशीचा उपदेश करून गेले, महात्माजी तो करीत आहेत, व काळाच्या उदरांत भावी काळांत असाच आणखी एकादा तेजस्वी कर्मवीर तरी नसेल कशावरून ? आणि अशा देशसेवकांच्या लेखमालेच्या उपदेशाकडे आमच्या हिंदकन्या व हिंदपुत्र लक्ष देणार नाहींत हें केवळ अशक्य आहे.

विमल आज प्रथमच असा गंभीर विचार करीत होती. विचार करतां करतां तिनें सहजच स्वतःकडे पाहिलें, तिची दृष्टी तिच्या त्या उंच टाचेच्या बुटावर खिळून गेली. ' माझ्यासारख्या तरुणीनें हे असले बूट कां म्हणून घालावे ? ' विमलेची विचारमालिका सुरू झाली, ' असले बूट कुचकामाचे आहेत. खरोखर हे विचार मला ह्यापूर्वी कधींच कां बरें सुचले नाहींत ? हे बूट महाग तर आहेतच पण शिवाय त्यांनीं माझ्या पायाचीही खराबी केली आहे. ' विमलचे हात त्या बुटाकडे गेले तिनें पायांतले बूट खसकन् काढले नंतर ते हातांत धरून ती चमत्कारिक मुद्रेनें त्याच्याकडे पाहूं लागली. बुटाच्या आंतल्या बाजूस ' विमल ' अशीं असलेलीं अक्षरें तिनें पाहिलीं. तिला आतां त्या बुटांचा मनस्वी संताप आला. ' बाबांनो ! ' विमल पुटपुटली, ' आतां निदान या जन्मीं तरी तुमची संगत मला नको. ' विमल उभी राहिली उजव्या हातांतले ते बूट तिनें दूरवर रागानें भिरकावून दिले.

बूट भिरकावून देतांच तिला समाधान झालें. एका दुष्ट व भयंकर संकटांतून आपण सुटलोंसें तिला वाटलें असावें. केसांवरून हात फिरवून ती पूर्ववत् खालीं बसली. तिनें सभोंवार नजर टाकली. सहस्त्ररश्मी भगवान सूर्यनारायण आपला सोनेरी साज गुंडाळून विश्रांति घेण्यासाठीं मोठ्या लगब-

गीनें चालले होते. त्यांची ताटातूट होणार ही कल्पना मनांत येऊन कीं काय भूमाता काळें आवरण घेण्याच्या विचारांत होती. तिचा डामडौल पार नाहिसा होत चालला होता. बरेच लोक आतां घरोघर गेले असून कांहीं थोडक्याच अस्पष्ट अशा व्यक्ति दिसत होत्या. विमल आज विचाराच्या वावटळींत सांपडल्यामुळें बराच वेळ तेथें बसली होती. पण उशीर झाल्याचें ध्यानीं येतांच ती उठली व वाट चालूं लागली. टेकडी उतरतांना मात्र तिची फार तारांबळ उडाली. रोज तिच्या पायांत बूट असल्यामुळें तिला खडे बोचत नसत. आतां ती अनवाणी होती. खडे बोचतच होते. तरी ती धिटाईनें तशीच पुढें गेली. ' काय वाटेल तें झालें तरी पायांत विलायती बूट म्हणून घालावयाचा नाहीं. ' असा तिनें निश्चय केला होता.

आजचा दिवस विमलच्या आयुष्यांतील एक महत्त्वाचा दिवस होता म्हटलें तरी चालेल. आज तिची मैत्रीण सुंदर बरोबर न आल्यामुळें कधींही न सुचलेले विचार विमलला सुचले.

विमल तशीच पुढें चालली. रस्त्यांतून मधून मधून कांहीं व्यक्ति तिला भेटत. त्यांतले बरेच तिच्या कॉलेजांतील विद्यार्थी होते. कॉलेजांतल्या मुली जरी फार विद्यार्थ्यांना ओळखतात तरी पुष्कळ विद्यार्थ्यांना कॉलेजांतल्या मुलींचीं नांवें गांवें तोंडपाठ असतात. विमल बऱ्याच विद्यार्थ्यांच्या माहितींतली होती. विमलेचा मात्र एकही विद्यार्थी मित्र ओळखीचा नव्हता विमलेचा भपकेदार पोषाख हा कॉलेजांतला मुख्य चर्चेचा एक विषय असे. विमल आज रस्त्यांतून अनवाणी जात आहे, ही गोष्ट किंचित् अंधार पडला होता, तरीही कांहीं विद्यार्थ्यांच्या लक्षांत आल्यावांचून राहिली नाहीं. विमल चालली असतां मध्येंच ' काय रे बुवा आज बुटांची चोरी झाली वाटतें ! ' असे एकाचे उद्गार व त्या मागोमाग उत्पन्न झालेला हास्य-ध्वनी तिच्या कानीं आला.

' ह्या लोकांना माझ्या बुटांच्या नसत्या चवकश्या कां म्हणून ! ' विमल चालतां चालतां विचार करूं लागली ' मी बूट घालीन, चपला घालीन अगर आत्तासारखीच कांहीं एक न घालतां अनवाणी चालेन, माझी मी वाटेल तें करण्यास मुखत्यार आहें. '

आणि कॉलेजांतल्या विद्यार्थ्यांना मुलींबद्दल अशा नसत्या उठाठेवी करण्याची फार हौस असते हें कांहीं खोटें नव्हे. वर्ग चालू असतांना ह्मणा अगर सुट्टींत ह्मणा बऱ्याच विद्यार्थ्यांच्या अशा कुटाळक्या चाललेल्या असतात. मुलींच्या अंबाड्यावरचीं फुलें, त्यांच्या पातळांचे रंग अंबाडा न घालतां मोकळ्या सोडलेल्या शेपट्या इत्यादि विषयांवर मुलांमध्यें नानाप्रकारचें वाद विवाद चाललेले असतात. जणूं काय विद्यार्थ्यांना असल्या क्षुल्लक वादविवादाखेरीज बोलण्यास दुसरें विषयच सांपडत नाहींत !

विमल पुढें चालली होती, आतां ती शहराच्या जवळ आली होती. अंधार वाढतच होता इतक्यांत एक व्हिक्टोरिया मागून भरधांव आल्यामुळें विमल रस्त्याच्या कडेस झाली; तों काय आश्चर्य ! ती व्हिक्टोरियाही तिच्या जवळच येऊन ठेपली. आंतून तीन अंधूक व्यक्ती खालीं उतरल्या, विमल घाबरली, तिचे हातपाय लटपटूं लागले. तिनें एकदम एक कर्णभेदक किंचाळी फोडली; टेंकडीच्या भयाण आसमंतांत एक करुण प्रतिध्वनी उमटला !!

---

## प्रकरण ५ वें.

## ' सुंदरच्या प्रेमाचें गुपित '

आज आपला इतक्या मंडळींदेखत पराभव झाला ही गोष्ट सुंदरच्या हळव्या मनाला लागून राहिली. ती तडक आपल्या खोलींत गेली. आपल्या मागोमाग विमल आपली समजूत घालण्यासाठीं येणार हें तिनें ताडलें, पण आज तरी आपण विमलबरोबर बोलावयाचें नाहीं असें ठरवून तिनें दार घट्ट लावून घेतलें. थोड्याच वेळांत विमल बाहेर आली पण बरींच आर्जवें करूनही कांहीं फायदा होत नाहींसें पाहून ती कशी निघून गेली हें वाचकांना माहीतच आहे. विमल निघून गेली हें सुंदरला समजलें.

काय चमत्कार आहे पहा ! विमल व सुंदर दोघीही जिवलग मैत्रिणी होत्या तरी त्या असल्या क्षुल्लक कारणांवरूनही भांडत. वास्तविक पाहतां खेळ

तो काय आणि त्यांत आपला आज बऱ्याच दिवसांनीं पराभव झाला म्हणून सुंदरनें एकदम जिवाभावाच्या मैत्रिणीशीं अबोला धरावा हें अगदीं विसंगत दिसतें. पण हे अबोले हीं भांडणें म्हणजे त्या दोघींची मैत्री जास्त दृढ करण्याची साधनें होत हें मागें सांगितलें आहे. विमल निघून गेली हें दाराच्या फटींतून पाहतांच सुंदर धांवत धांवत बिछान्याजवळ गेली व तिनें आपलें वदन उशींत खुपसलें, तिचे कपाळावर व गालावर नाचणारे केंस एकदम दबून गेले, तिच्या आंबाड्यावरचें एक पिवळें फूल खालीं पडलें. उशींत तोंड खुपसल्यामुळें तिचें कुंकूं फरफाटलें. खिडकींतून येणारें एक सूर्य-किरण तिच्या अंगावर पडलें होतें.

सुंदरची खोली फार अस्ताव्यस्त होती. टेबलावर सुमारें तीस एक पुस्तकें असतील पण तीं सर्व वाटेल तशी पडलेलीं होतीं. सुंदरच्या बिछान्यावरच गोविंदाग्रजाची वाग्वैजयंती पडलेली होती. टेबलावरचीं सर्वच पुस्तकें अभ्यासाचीं होतीं असें नाहीं, त्यांत परीक्षेस नसलेलीं इतर वाचनीय पुस्तकेंही बरींच होतीं. खिडकीजवळच्या कोंपऱ्यांत एक छोटेसें कपाट होतें त्याचें एक दार उघडेंच होतें त्यांत दोन तीन पातळें कोंबलेलीं दिसत होतीं, कपाटावर एक मोठा आरसा असून तो मात्र पुसलेला होता, आरशासमोर एक हस्तीदंती कंगवा असून शेजारीं एक लाइमज्यूसची बाटली होती. कपाटावरच चार दोन पिना पडलेल्या होत्या.

सुंदरनें उशींत तोंड खुपसलें व ती एकदम हंसूं लागली. ती बराच वेळ तशी हंसत होती. 'विमलची फजिती करून दार न उघडतां आपण तिला कसें परत लावलें.' हा विचार मनांत येऊन तिला हंसू येत असावें. थोड्या वेळांत हंसण्याचा भर हटल्यानंतर तिनें मान वर उचलली तेवढ्यांत तिचा पाय खालीं पडलेल्या फुलावर पडला. तिचे केस बरेच अस्ताव्यस्त झाले होते. अजूनहि तिची हास्यमुद्राच होती ती एकदम बिछान्यावर पडली. जवळच पडलेलें पुस्तक घेऊन ती कांहीं ओळी गुणगुणूं लागली. ओळी गुणगुणण्याचा तिला कंटाळा आला असावा. कारण पुस्तक हातांत घेऊन फार तर पंधराच मिनिटें झालीं न झालीं तोंच तिनें तें खालीं टाकलें. पुस्तक

खालीं जमिनीवर मुडपून पडलें. आंतील कांहीं पानें वाकडीं तिकडीं होऊन चुरगळून गेलीं. पुस्तक खालीं टाकून आळस देण्यासाठीं म्हणून सुंदरनें हात पाय लांबविले. पाय लांबविल्यामुळें बिछान्यावर असलेला पांघरुणाचा बोळा खालीं पडला. बिछान्याला उशाचे बाजूस एक लोखंडाच्या नळाची आडवी कमान होती. सुंदरनें आज कांहीं प्रथमच आळस दिला असें नाहीं. तरी पण काय असेल तें असो आज तिचा उजवा हात खाडकन त्या लोखंडी दांड्यावर आदळला. त्या हातांतल्या दोन निर्जीव बांगड्या वाढवून त्यांचे तुकडे तिच्या उशीवर पडले. हात जवळ घेऊन डोळे मिटून, सुंदर स्वस्थ पडली व थोडयाच वेळांत तिला झोपेची किंचित् डुलकी आली.

रात्रीप्रमाणेंच कित्येक वेळां दिवसाही झोपेंत स्वप्नें पडतात. सुंदरलाही आतां स्वप्न पडलें. जणूं काय ती व तिची मैत्रिण विमल अशा दोघीजणी एका निर्जन रानांतून हिंडत आहेत. वेळ अशी सायंकाळची होती. वारा झाडींतून जातां जातां मनोहर गाणें गात होता. झाडांना बिलगून बसणाऱ्या वेलींच्या सर्व कळया उमलून गेल्यामुळें त्यांची शोभा खरोखर अवर्णनीय होती. फिरतां फिरतां त्या दोघीही अपापल्या पदरांत विविध रंगाचीं फुलें गोळा करून घेत होत्या. मधेंच सुंदर एकादी लकेर घेई आणि त्या गोड गाण्याचा सुरम्य प्रतिध्वनी जवळच असलेल्या डोंगराजवळ स्पष्टपणें उमटे. दोघींनींही मनमुराद फुलें जमा केलीं. मध्येंच एकदां विमलनें एक फूल तोडून तें सुंदरच्या अंगावर फेकलें. झालें. तत्क्षणींच पुष्प-युद्धास सुरवात झाली. विमलनें एक फूल मारतांच सुंदरनेंही एक फूल घेऊन तें विमलचे अंगावर फेकलें. वाढतां वाढतां हीं फुलांची मारामारी फार रंगांत आली. दोघींच्याही पदरांतील फुलें संपून गेलीं तरी युद्ध संपेना. विमल व सुंदर जवळ असलेल्या रोपट्यांचीं फुलें खुडूं लागल्या. थोड्याच वेळांत दोघींच्याही भोंवतीं फुलांचा गळयाइतका ढीग पडला. तोंच भोंवतालचीं झाडेंही वाऱ्यानें गदगदूं लागून त्यांचीं फुलें त्या दोघींच्या डोक्यावर पडूं लागलीं. पांच मिनिटाच्या आंत त्या दोघी सुगंध-युक्त विविध रंगाच्या फुलांच्या ढिगाऱ्यांत दिसेनाशा झाल्या. सुंदरचा जीव कोंडूं लागला.

सुंदर जागी झाली व एकदम उठून बसली. आतांपर्यंत पाहिलेला हा मजेदार प्रकार स्वप्नांतलाच होता हें ध्यानीं येतांच तिच्या वदनावर मंद स्मित झळकलें.

सुमारें अर्ध्या तासानंतर तिच्या खोलीच्या दारावर कोणीशी थाप मारली, सुंदरला वाटलें कीं विमलच फिरावयास जाण्यासाठीं ह्मणून आली आहे. ती गप्प बसली, थोडा वेळ दार उघडूंच नये असा तिनें विचार केला, पण लगेच ' सुंदर दार उघड ' असे शब्द तिच्या कानीं पडले, ते शब्द कानीं पडतांच सुंदर क्षणभर चमकली, तिचें वदन आरक्त झालें, त्या आवाजा-बरोबर तिच्या डोळ्यांत प्रेमाचें पाणी खेळूं लागलें. धांवत जाऊन तिनें दार उघडलें.

बाहेर एक तरुण उभा होता. त्याचा चेहरा रुबाबदार असुन त्याची मुद्रा निश्चयी होती. तो आंत आला व खुर्चीवर बसला, सुंदरनें दार लावून घेतलें व ती म्हणाली काय वसंतराव ? मागच्या आठवड्यांत आपण आला नाहीं ?"

वसंत हा सुंदरचा बाळपणचा स्नेही. सुंदरचे वडील मुंबईस ज्या घरांत राहात त्याच्या शेजारचाच वाडा वसंताच्या वडलांचा होता. वसंताची परि-स्थितीही थेट सुंदरसारखी होती. त्यालाही मुंबईची हवा मानवत नसल्यामुळें तोही लहानपणापासून विलासपूरांतच बोर्डिंगांत राहात असे, मात्र तो सुंदर-पेक्षां बराच हुषार होता, तीन चार यत्तांचा खासगी अभ्यास करून तो सुंदरच्या आधींच तीन वर्षें मॅट्रिकची परीक्षा पसार झाला होता. सुंदर कॉले-जमध्यें आली तेव्हां हा सीनियर बी. ए. त ह्मणजे यशवंताच्याच वर्गात होता. विमल सुंदर या जशा दोन जिवश्च कंठश्च मैत्रिणी तसेंच यशवंत व वसंत हे दोघे प्रेमळ मित्र होते, सुंदर व वसंत ह्या दोघांची जरी लहानपणा-पासून ओळख होती तरी तीं दोघेंही भिन्नजातीय होतीं, वसंत अस्सल कोंकणस्थ ब्राह्मणाचा मुलगा होता. सुंदर विलासपूरच्या मुलींच्या बोर्डिंगांत राही तेव्हां-पासून वसंत तिच्याकडे वरचेवर जात येत असे. लहानपणचें अजाण व अल्लड वारें संपून दोघांनींही तारुण्यांत प्रवेश केला होता, आणि साहजिकच त्याचें एकमेकांवर प्रेम जडलें होतें, सुंदर मॅट्रिक होऊन वसंताच्या कॉलेजांत आली तेव्हां तर वसंताला तिचेबद्दल स्वाभिमान कौतुक वाटूं लागलें. वसं-

तही कॉलेजच्या वसतिगृहांत असे व तो चार दोन दिवसाआड सुंदरची भेट घेई. वसंत सुंदरच्या खोलींत आजच्यासारखाच पूर्वी चांगला दहापांच वेळा आला होता. मध्यें कांहीं दिवस विमल आजारी होती तेव्हां सुंदर वसंताबरोबरच फिरावयास गेली होती.

पण ही गोष्ट सुंदरच्या शेजारच्याच खोलींत राहणाऱ्या एका गंगू पवार नांवाच्या मुलीला चमत्कारिक वाटून ती बरेच दिवस सुंदरची फटफजिती करण्यास एखादी संधी पहात होती. गंगू पवार म्हणजे एक फाजील स्वातंत्र्यानें भरलेली चवचाल छोकरी होती. अशा मुलींना साऱ्या मुली आपल्यासारख्याच आहेत असें वाटूं लागतें. किंबहुना साऱ्या मुली आपल्यासारख्याच असाव्यात अशी त्यांची इच्छा असते. आपल्याबद्दल शेजारच्या खोलींत राहणाऱ्या मैत्रिणीला इतक्या भयंकर पापकल्पना सुचत असतील याची सुंदरच्या मनांत कल्पनाही नव्हती. आणि गंगू पवारही वरून वरून अगदीं सभ्यतेचा व आपण सुंदरची मैत्रीण आहोंत असा आव आणी. आज दुपारीं झालेल्या विमल–सुंदरच्या सामन्यांतही तिनें सुंदरच्या बाजूनें बराच आरडाओरडा केला होता; मात्र कांहीं एक कारण नसतांनाही ती सुशील सुंदरचा द्वेष करी.

पापी स्त्रियांचा स्वभावच असा पापमय असतो त्यांना चांगुलपणाचा हेवा वाटूं लागतो. सच्छील स्त्रियाबद्दल त्यांच्या मनांत द्वेषबुद्धी उत्पन्न होते. उलट पवित्र व अजाण स्त्रियांना फशीं पाडून त्यांनाही आपल्याच मालिकेंत आणून बसविण्याची त्या खटपट करूं लागतात. गंगू पवार जितकी पापी तितकीच ती हुषार होती असें म्हटलें पाहिजे, कारण नाहींतर ती मॅट्रिकची परीक्षा पास झाली नसती. परंतु युनिव्हर्सिटीच्या पदव्या मिळविणें म्हणजे पावित्र्याचें सर्टिफिकेट मिळविणें असें नव्हे. उलट कित्येक वेळां पुरुषांप्रमाणेंच स्त्रियाही असल्या पदव्या मिळवून आपला बदलौकिक टाळतांना दिसतात ! पण गंगूसारख्या दूषित तरुणी सुशिक्षित समाजांत फारशा सांपडत नाहींत हें सुदैव होय ! तथापि युनिव्हर्सिटीच्या पदव्या मिळविणाऱ्या तरुणींत गंगू पवारसारख्या तरुणी मुळींच नसतात असें म्हणणें खास हास्यास्पद होईल, स्त्रीशिक्षण आज काल वाढत्या प्रमाणावर आहे अलीकडचा स्त्री-

समाज मागील पिढींतल्या स्त्रियांपेक्षां जास्त धीट झाला आहे व होत आहे. पण कित्येक वेळां ह्या धिटाईला फाजील-स्वातंत्र्याची जोड मिळाली ह्मणजे मुली बिघडतात असें वारंवार दृष्टीस पडतें. मात्र अशा बिघडलेल्या मुली अमूकच एका जातीच्या असतात असें ह्मणणें गाढवपणाचे होईल. केवळ ब्राह्मणांच्या मुली वाईट असें ह्मणणाऱ्या अंध व बहकललेल्या टीकाकारांनीं ही गोष्ट प्रथम ध्यानांत ठेवली पाहिजे.

स्त्री-समाजाची सर्वांगीण सुधारणा होत आहे ही गोष्ट अभिनंदनीय तर खरीच पण त्याबरोबरच उत्पन्न होणाऱ्या फाजील-स्वातंत्र्याला मात्र वेळींच आळा बसला पाहिजे.

फाजील स्वातंत्र्यानें बहकलेल्या तरुणींपैकींच गंगू पवार ही एक पतित व्यक्ती होती.

'काय वसंतराव ? मागच्या आठवड्यांत आपण आलां नाहीं ?' ह्या सुंदरच्या प्रश्न ऐकून वसंताला बरें वाटलें. आपल्या येण्याची ही इतक्या उत्सुकतेनें वाट पाहून त्याला आनंद झाला यांत नवल तें काय ? आपली प्रिया आपली वाट पहात बसते, तिचे डोळे आपल्या वाटेकडे खिळलेले असतात, तिचे कान आपल्या पावलांच्या आवाजासाठीं आधाशासारखे हपापलेले असतात, हें ऐकून कुठल्या प्रियकराला आनंद होणार नाहीं बरें ?'

'सुंदर! आज रात्रीच्या गाडीनें मी मुंबईस जाणार आहे. मी परवां संध्याकाळीं परत येईन, तुझा कांहीं निरोप घरीं कळवायचा आहे का ?' मागील आठवड्यांत न येण्याचें कारण न सांगतां वसंत मुख्य मुद्याकडे वळला. नंतर त्यांचें बराच वेळ संभाषण झालें. सुंदरनें स्टो पेटवून दोन कप चहा केला. नंतर एक कप हलकेंच तिनें वसंतरावांच्या हातांत दिला व ती लडिवाळ स्वरांत म्हणाली, 'वसंतराव ! काल हा नवा कप मुद्दाम मी तुमच्यासाठीं ह्मणून विकत आणला आहे हो !' सस्मित मुद्रेनें वसंतानें कपाकडे नजर टाकली, 'Love me' अशी त्यावरील सोनेरी रंगांत लिहिलेलीं अक्षरें वाचून वसंतानें सुंदरकडे बघितलें ! सुंदरही हातांत कप घेऊन वसंताकडेच पहात होती. नजरेला नजर मिळाली, हृदयाला हृदय समजलें, प्रेमाला प्रेमाचा अर्थ पटला, दोघेही खुदकन हंसलीं !

नंतर सायंकाळ झालेसें पाहून वसंत सुंदरचा निरोप घेऊन निघून गेला, सुंदरनें अजून खोलींत दिवा लावला नव्हता, वसंत जिन्याच्या खालच्या पायरीवर गेला असेल नसेल तोंच गंगू सुंदरच्या खोलींत घुसली ! !

---

## प्रकरण ६ वें.

# मित्रांचे विचार !

विमल–सुंदरचा पिंगपाँगचा सामना चालला होता त्याचवेळीं यशवंत आपला परमप्रिय मित्र वसंत याच्या खोलींत बसला होता. त्यांचें नेहमीं नाना विषयावर वादविवाद होत. दोघांनाही आपण कांहींना कांहींतरी देश-कार्य करावेसें वाटे. नुसत्या पदव्या मिळविणें किंवा सरकारी नोकऱ्या मिळविणें हें त्यांचें ध्येय नव्हतें.

यशवंत खुर्चीवर बसला होता व वसंत इंझिचेअरवर पडला होता, आज त्यांचें ब्राह्मण–ब्राह्मणेतर वादावर बोलणें निघालें होतें. वसंत पक्का कोंकणस्थ ब्राह्मण होता. यशवंत जातीनें कोण होता हें जरी एक गूढ होतें तरी तो अगदीं लहानपणापासून रावसाहेबांसारख्या ब्राह्मणेतराच्या घरीं होता व त्यामुळें त्यालाच नव्हे तर सर्व लोकांना यशवंत जातीनें मराठा असावा असेंच वाटत होतें.

‘वसंता ! मी जातीनें कोण आहे हें माझें मला पक्कें ठाऊक नाहीं हें तूं जाणतोस, पण मी कोणत्याही जातीचा असलों तरी हे जातीचे प्रश्न राजकीय सुधारणेच्या आड येऊं नयेत असें मला वाटतें !’

‘म्हणजे, मग हिंदु–मुसलमानांनींही जातिधर्म विसरावा म्हणतोस !’

‘नाहीं, माझें तसें म्हणणें नाहीं. ब्राह्मण, क्षत्रीय, वैश्य, शूद्र किंवा अशाच प्रकारच्या जाती पोटजाती आजपर्यंत होत्या, आहेत व त्या तशाच पुढेंही कायम राहतील. पण माझें म्हणणें एवढेंच कीं प्रत्येकानें एकमेकांशीं भांडणें भांडत बसण्यांत कांहीं अर्थ नाहीं, हल्लीं जातिवैमनस्याच्या ह्या आगींत मूळ

उद्देशाचा व स्वराज्य–प्राप्तीचा सर्वांना विसर पडत चालला आहे ही गोष्ट सर्वस्वी घातुक आहे. वसंता, तुला लहानपणीं वाचलेली चार बैलांची व एका वाघाची गोष्ट ठाऊक आहे ना! त्या बैलांत जोपर्यंत एकोपा होता, जोपर्यन्त ते बैल मी काळा, तूं पिवळा, तो पांढरा इत्यादि क्षुल्लक बाबींवरून न भांडतां एकत्र नांदत होते तोपर्यन्त त्यांच्यासमोर येण्याची वाघासारख्या सामर्थ्यवान् हिंस्र पशूचीही छाती झाली नाहीं. पण तेंच वितुष्ट येऊन त्या चौघांचीं तोंडें चार बाजूला झालीं त्याबरोबर वाघानें सर्वांचा फडशा उडवला. वसंता, हिंदुधर्म जोपर्यंत जिवंत आहे तोपर्यंत त्यांत भिन्न भेदाभेद रहाणारच. हिंदुधर्माच्या अस्तित्वाबरोबरच जे भेदाभेद अस्तित्वांत आले ते आतां एकदम नाहींसे होतील असें शक्य तरी आहे काय? मग उगाच ब्राह्मण–ब्राह्मणेतर वादासारखे विषय काढून आपआपसांतच झगडण्यांत काय अर्थ आहे बरें? आजपर्यन्त ब्राह्मण लोकांचें वर्चस्व होतें पण त्याबरोबरच सारे ब्राह्मण अप्पलपोटे आहेत असें कसें म्हणतां येईल? ब्राह्मणांनीं विनाकारण ब्राह्मणेतराला शिव्या देणें जितकें हानिकारक आहे तितकेंच ब्राह्मणेतरांनींही ब्राह्मणांचा द्वेष करणें तोट्याचें आहे. हे आपापसांतले वादच हिंदुधर्माला विघातक होतील !!

यशवंतानें हे आपले विचार आज नव्यानेंच प्रकट केले होते असें नाहीं. यशवंत हिंदुधर्माचा कट्टा अभिमानी होता. हिंदुधर्म हें त्याला जीवन–सर्वस्व वाटे. पण हिंदुधर्मांत माजलेल्या ब्राह्मण ब्राह्मणेतर असल्या वादांचा मात्र त्याला संताप येई. कित्येक ब्राह्मणेतर 'ब्राह्मण तेवढा वाईट' असें म्हणत, त्यांचा यशवंताला तिरस्कार वाटे. त्या बरोबरच 'ब्राह्मणेतर तेवढे कुचकामाचे' असें म्हणणाऱ्या ब्राह्मणांचा त्याला राग येई. ब्राह्मण ब्राह्मणेतर असले वाद न घालतां जर प्रत्येक हिंदूनें 'मी हिंदू' अशा एकाच भावनेनें व एकोप्यानें काम केलें तर स्वराज्य खास दूर नाहीं अशी त्याची ठाम समजूत होती. कित्येक वेळां ह्याच बाबतींत त्याचा व मोहनाचा चांगला खटका उडे. 'बामणाच्या पोरी पळविणें हेंच माझें ध्येय' असे मोहनाचे पापी ऊद्गार ऐकून, यशवंताला–एका ब्राह्मणेतराच्या कृपेमुळें लहानाच मोठा झालेल्या—त्या यशवंताला क्रोध आंवरेनासा होई. मोहनासारखे नराधम

ह्मणजेच अभागी भरतभूमीला पारतंत्र्यांत अधिकाधिक गाडणारे मात्रागमनी सैतान होत असें तो म्हणे !

यशवंताचे ते उद्गार ऐकून त्याचा मित्र वसंत ईझिचेअरवर उठून बसला व म्हणाला ' यशवंता ! मग आपल्यासारख्यानें काय करावें ह्मणतोस ? '

' काय करावयाचें ? आपल्यासारख्या तरुणांनीं प्रथम हें जातिवैमनस्याचें खूळ सोडण्याचा प्रयत्न केला पाहिजे. ब्राह्मण ब्राह्मणेतरांची एकी करण्याची आपण जारीनें खटपट केली पाहिजे. आपल्या गरीब बंधू-भगिनींना फावल्या वेळीं मोफत शिक्षण दिलें पाहिजे. खरोखर वसंता ! आपल्या ह्या हिंदभूमींत सुखसंपन्न असलेल्या सुशिक्षित स्त्रिया किती तरी असतील. अशा स्त्रियांनी जर फावल्या वेळीं आजूबाजूच्या गरीब स्त्रियांना शिक्षण देण्याचा प्रयत्न केला तर किती चांगलें होईल ! प्रत्येक पदवीधर स्त्रीनें निदान कमीत कमी शंभर गरीब स्त्रियांना साक्षर केलें तर राष्ट्रांची केवढी प्रगती होईल ? पदवीधर स्त्रिया असें कांहीं तरी लोक कल्याणाचें कार्य न करतील तर त्यांच्या त्या पदव्यांचा उपयोग तरी काय ? तें कांहीं नाहीं वसंत ! अगदीं पहिलें कार्य ह्मणजे ब्राह्मण ब्राह्मणेतरांची गोड एकी करणें हेंच होय ! '

इतकें बोलून आपल्या पायाकडे डोळे लावून यशवंत स्वस्थ बसला. त्याच्या मनांत असे कांहीं विचार आले ह्मणजे त्याचा चेहरा एक प्रकारच्या धडाडीच्या तेजानें चमकूं लागे. वसंताचा यशवंत हा नुसता मित्र नव्हता पण एक वंदनीय गुरु होता असें ह्मटलें तरच तें अधिक शोभल. कित्येक वेळां यशवंताचे व वसंताचे विचार परस्परांशीं जुळत नसत. पण प्रत्येक वेळीं " आपण चुकत असून यशवंतच बरोबर आहे " असें वसंताला वाटे.

' वसंत ! ' यशवंत सौम्य स्वरांत ह्मणाला. ' तूं तर ब्राह्मण आहेस, व मला अद्याप तरी लोक ब्राह्मणेतर ह्मणजे मराठा समजतात हेंही खरें आहे. तुझी माझी मैत्री ह्मणजेच ब्राह्मणब्राह्मणेतरांची गोड एकी नव्हे का ! '

' होय ! यशवंत, माझ्या पूर्वजन्मींच्या पुण्याईमुळें मला तुझ्यासारखा सहाध्यायी लाभला. तुझी माझी मैत्री यावज्जीव अखंड राहणार ! '

' मग वसंत एकदां आपली परीक्षा झाली कीं कांहीं तरी राष्ट्रकार्य करण्याचा निश्चय करूं या. अरे, आपल्यासारख्या ताज्या रक्ताच्या तरुणांक-

ठेच आपली भारतमाता उद्धाराच्या आशेनें डोळे लावून बसली आहे. ती दरिद्री आहे, अभागी आहे, तरी ती आपली माता आहे. ती आपली जन्मभूमी आहे. वेड्या 'जननी जन्मभूमिश्च स्वर्गादपि गरीयसी' हें वचन आपणांस काय सांगतें ? तें असें सांगतें कीं बाबांनों मातृसेवा व देशसेवा हाच स्वर्ग. स्वर्ग ह्मणजे कांहीं निराळा पदार्थ नाहीं. '

' यशवंत तूं ह्मणतोस तें सारें खरें ! पण आजकालच्या तरुणांना बी. ए. एम. ए. च्या डिगऱ्या मिळवून पन्नास साठ रुपयांवर समाधान मानावें लागतें. जवळ जवळ निम्मे आयुष्य डिगऱ्या मिळविण्यांतच खर्ची पडून उरलेलें आयुष्य आतेष्टांच्या उपाधी तोंडांत चार घास घालण्यासाठीं म्हणून खर्डेघाशींत खपून जातें. अशा दुर्घट परिस्थितींत बिचाऱ्या तरुणांनीं देशोद्धार तो काय करायचा ?

' वसंत तूं ह्मणतोस तें वरवर पहाणाऱ्याला जरी खरें वाटलें तरी तें साफ चुकीचें आहे.खरी परिस्थिती याहून फार भिन्न आहे. पहिली गोष्ट ह्मणजे ही कीं आज हयात असणाऱ्या शेंकडा नव्वद तरुणांना चहा, सिगारेट व दारू ह्यांतलें कोणतें ना कोणतें तरी व्यसन जडलेलें असतें. या व्यसनापायीं त्यांचा बराच पैसा नाहक उडत असल्यामुळें इतर पोटापाण्याच्या सोयीसाठीं त्यांना प्राण जाईपर्यंत काबाड कष्ट करावे लागतात. मिळणारे चार पैसेही हिरावून घेण्यास नाच, तमाशे इत्यादि विलासी मोह अगदीं सरसावून उभे असतात. पण मी ह्मणतों, कीं प्रत्येकानें स्वदेशी कापड वापरण्याचा व चहा आणि सिगारेट सोडण्याचा निश्चय केला तर काय होऊं शकणार नाहीं ? पोटापाण्याला पैसे मिळवून सुद्धां देशसेवा करण्याची धमक व उमेद प्रत्येकाच्या अंगांत निर्माण होईल. अरे व्यसन राष्ट्रविघातक असतें हे लक्षांत ठेव. व्यसनापायींच राष्ट्रें धुळीला मिळतात. पण निर्व्यसनी लोक काय करूं शकणार नाहींत ? निर्व्यसनी लोकांना काय 'अशक्य' आहे ? आमचा हिंदुस्थान दारूत बुडाला. आमचा हिंदुस्थान व्यसनामुळें दीन दुबळा झाला. रे ! वसंता ! आमच्या तरुणांना देशसेवेकडे लक्ष देणें अशक्य आहे असें ह्मणणें लांछनास्पद आहे. खरी गोष्ट अशी आहे कीं आमच्या तरुणांना चैनबाजी करायला हवी. त्यांना हालअपेष्टा नकोत. अरे, पण अशानें का देशो-

द्धार होत असतो ? देशोद्धार होण्यासाठीं तरुणांनीं स्वावलंबनाचा धडा घेतला पाहिजे. नानातऱ्हेच्या हालअपेष्टा सोसण्यास त्यांनीं एका पायावर तयार राहिलें पाहिजे. चणे खावे लोखंडाचे, तेव्हां ब्रह्मपदीं नाचे ! स्वराज्याचा मार्ग चैनीचा नव्हे. देशसेवा म्हणजे आतषबाजी नाहीं. समाजसुधारणा विलासांत गुंगत राहून होत नसते.'

यशवंत एवढें बोलून पुन्हां स्वस्थ झाला. वसंतालाही यशवंताचे हें बोलणें पटलें असावेसें दिसलें. तोही किंचित्काल स्तब्ध झाला.

तो थोड्या वेळानें म्हणाला 'मग तुझा तो मोहनराव स्वतःला सत्य-शोधक म्हणवतो रे कसा ?'

'अरे कसा म्हणजे काय ? स्वतःला मोठेपणा घेण्याची ज्याला त्याला पूर्ण मुभा आहे. मोहन स्वतःला सत्यशोधक म्हणवतो तर त्याच्या तोंडाला हात कोण लावणार ? उद्यां जर मी स्वतःला लोकमान्य म्हणूं लागलों तर माझ्या तोंडाला कोणीही हात लावणार नाहीं !'

'म्हणजे तुझा मोहन स्वतःला सत्यशोधक म्हणवतो हें सारें थोतांड आहे तर ?'

'यांत तिळभरही शंका नाहीं, मोहनासारखे प्राणी किती नीच असतात याची तुला कल्पना नाहीं. आणि म्हणूनच स्वतःचा नीचपणा झांकण्यासाठीं त्याच्यासारख्या प्राण्यांना देशभक्तीचें पांघरूण घ्यावें लागतें. खरोखर हे असलेच लोक आपल्या देशाचा अधःपात करणार ! कित्येक लोक आपला पाजीपणा झांकण्यासाठीं देशभक्ती अगर खादी असल्या अमोलिक वेषाचा दुष्ट उपयोग करतांना आढळतात. ह्या लोकांच्या अंगावरची खादी जर काढून टाकली अगर ह्यांच्या अंगावरची देशभक्ती जर किंचित्काल बाजूस सारली तर आपल्याला फार मोठा चमत्कार दिसेल ! बऱ्याच लुटारूंचा संभा-वित सोदेपणा जगाच्या निदर्शनास येईल. अशा प्रकारचा देशसेवक म्हणजे समाजकंटकच होय. खरी देशसेवा करणारा महात्मा, कळकळीनें राष्ट्रसेवा करणारा सत्यशोधक, हे केव्हांही कुणालाही वंदनीयच होत. परंतु समाजसेवेचा व सत्यशोधकत्वाचा पोकळ डोल मिरविणारे लोक निंदेस पात्र आहेत. वसंता ! खऱ्या मेहनतीनें देशसेवा

करणारा लोकोत्तर सत्यशोधक कुणाला प्रिय वाटणार नाहीं ! खरा सत्यशोधक, वंदनीय पुरुष होय. पण अलीकडे पहावें तों कांहीं लोक सत्यशोधक ह्या शब्दाचा अर्थ केवळ ब्राह्मणद्वेष्टे असा करतांना दृष्टीस पडतात. सत्यशोधक अमूक एका जातीचा असला पाहिजे असें म्हणणें योग्य होणार नाहीं. सत्यशोधक ब्राह्मणही असूं शकेल, सत्यशोधक मराठा असूं शकेल सत्यशोधकीय पंथ एका विशिष्ट जातीचा नव्हे. आपआपसांत ऐक्य निर्माण करून कार्य करणारा इसम हाच खरा सत्यशोधक आहे. मोहनासारखे लोक स्वतःस सत्यशोधक ह्मणवून त्या सत्यशोधक या पवित्र शब्दाची निंद्य अवहेलना करतात.'

'मग तूं त्या मोहनाची चांगली खोडकी कां जिरवींत नाहींस ?'

"वसंता ! मोहनाच्या पापाची मी आजपर्यंत पायमल्लीच करीत आलों आहे व यापुढेंही करीन. पण मोहनाची पायमल्ली मी यावज्जीव कधीही करणार नाहीं. त्यानें माझा गळा कापण्याचा जरी प्रयत्न केला तरी मी त्याच्या केसालाही धक्का लावणार नाहीं. मग जग मला हंसलें तरी चालेल. तो माझ्या अन्नदात्याचा मुलगा आहे. ज्या घराची मीठभाकर खाऊन मी जगलों वाचलों त्या घराण्याच्या सौख्याकरतां मला वाटेल त्या हालअपेष्टा सोसण्यास तयार झालें पाहिजे.

अशा रीतीनें बराच वेळ बोलत बसल्यानंतर संध्याकाळ होतांच यशवंत एकटाच फिरावयास निघाला व वसंतही त्याची बालमैत्रीण सुंदर हिला भेटावयास गेला. वसंत-सुंदरच्या भेटीची हकिगत मागील प्रकरणांत आपण पाहिलीच आहे. विलासपूरच्या टेकडीवर जाऊन यशवंत एका शांत जागीं बसला. त्याची ती अत्यंत आवडती जागा होती.

---

## प्रकरण ७ वें



# "चोरांच्या उलट्या + + !"



विमलची ती कर्णभेदक किंचाळी अंधाऱ्या शांततेंत फार भेसूर वाटण्यासारखी होती. आपल्यावर असें कांहीं संकट येणार आहे याची विमलेला

अंधुकही कल्पना नव्हती. आणि अशी कल्पना तिच्या मस्तकांत येणार तरी कशी ! पावित्र्याच्या गंभीर वातावरणांत सुखानें वाढलेल्या त्या मुलीला पापी डांवपेंचाचा अर्थ तरी कसा कळावा ? व्हिक्टोरियांतून तीन व्यक्ती खालीं उतरल्या हें तिनें पाहिलें होतें, त्यांतल्याच एकानें पुढें येऊन विमलेचा हात धरला.

विमलेचें सर्वांग त्या एकाच पापी स्पर्शामुळें थरथरूं लागलें, ती भ्याली, ती बावरली, तिच्या डोळ्यांपुढें अंधारी आली. तिला वाटलें कीं सारी पृथ्वी डळमळत आहे, तिला वाटलें कीं चंद्रसूर्यादि देदिप्यमान तारे भयंकर आरडा-ओरडा करून परस्परांशीं क्रूर झगडा करीत आहेत. तिला वाटलें कीं सारें ब्रह्मांड तिच्या अंगावर कोसळून पडत आहे.

विमल घाबरून गेली यांत नवल तें काय ? कामी विचारांच्या पापी पशूंनीं अचानक हल्ला केल्यावर गरीब असहाय्य बालिका बावरल्यावांचून कशी राहील ? दुष्टांच्या जाळ्यांत अडकलेली सच्छील हरिणी घाबरल्या-विना कशी राहील ! विमल एका निमिषांत मूर्छित पडली.

विमलच्या पवित्र शरीरावर हल्ला करण्याचा प्रयत्न करणारी ही चांडाळ तिकल कोण होती हें वाचकांच्या ध्यानांत आल्यावांचून राहणें अशक्य आहे. ही तिक्कल म्हणजे मोहन सर्जा व नान्या होत. एकाद्या पोरीवर अचानक छापा घालण्याच्या विचारानेंच हे दारूनें बेहोष झालेलें तीन शहाणे व्हिक्टोरियांत बसून विकासपूरांतील टेंकडीच्या बाजूस आलें होतें. त्यांना वाटेंत पुष्कळ मुली भेटल्या पण एकटी दुकटी अशी एकादी तरुणी त्यांना फारच थोड्या वेळां भेटली, आणि त्या-वेळीं उजेडही बराच असल्यामुळें इच्छित हेतू साध्य करतां येणें त्यांना अशक्य होतें. शेवटीं सायंकाळच्या आंत बऱ्याच तरुणी घरोघर गेलेल्या पाहून आजचा आपला डाव हुकला असें त्यांना वाटलें. आणि म्हणूनच अगदीं निराश होऊन हें बायकी वीर परत फिरले होते. त्यांच्या सुदैवानें व विमलेच्या दुर्दैवानें, विमल एकटी घरीं चाललेली अंधुक उजे-डांत त्यांच्या नजरेस पडली. मग काय विचारतां ? एकादी दीन हरिणी नजरेस पडतांच क्रूर व्याघ्रांची जशी अवस्था होते तशीच मोहन, सर्जा व

नाऱ्या यांची झाली. पण या तीन खातेऱ्यांत लोळण्यांतच समाधान मानणाऱ्या व्यक्तींना आपण वाघाची उपमा देणें अयोग्य आहे. वाघ क्रूर असला तरी तो शूर असतो. तो भयंकर असला तरी भित्रा नसतो. पण हे कमअस्सल चोर भित्रे होते शूर नव्हते. ते तिघेही पाण्याची पितरें होते. साधारण ताकतीच्या माणसांनीं जर त्या तिघांच्या एकेक सणसणीत थोबाडींत सटकावली असती तरी एका अर्ध्या निमिषांत त्यांनीं नरकाची वाट धरली असती. पण आश्चर्य हेंच कीं अशा पाण्याची पितरेंच महाअर्कट असतात. असें काडीपैलवान तरुणच स्त्रियांच्या अब्रूवर दरवडे घालण्यांस टपून बसलेले असतात.

एकाद्या तरुणीवर विषयलोलुप राक्षसांनीं हल्ला करावा हा देखावा समाजाचा अधःपात किती घोर थराला जाऊन पोहोंचला आहे हें स्पष्ट दर्शवीत नाहीं काय ? निष्कलंक तरुणी असहाय्य असल्या तर तो त्यांचा दोष कां आहे ?

पण तें कसेंही असलें तरी एकादी सुंदर तरुणी दिसली कीं तिच्याबद्दल पापी वासना मनांत आणणें हा संभावित लुटारूंचा नियम आहे. एकादी बालविधवा दुर्दैवी पोटाची वितभर खळी भरावी म्हणून नोकरीची याचना करण्यास आली तर तिच्या पावित्र्याचा बळी भक्षण करण्यासाठीं कित्येक काक टपलेले असतात असा कटु अनुभव रोजच्या व्यवहारांतही बघावयास सांपडतो. परिचारिकेसारखें समाजसेवेचें पुण्यकार्य करणाऱ्या पवित्र तरुणींच्या मागें चारदोन तरी निमकहराम कुतरडीं लागलेलीं पहावयास सांपडतात ! आणि या साऱ्या गोष्टी, हा सारा पाजीपणा, ही सारी छटेलबाजी संभावितपणाच्या पांघरुणाखालीं प्रतिष्ठितपणें चाललेली दृष्टीस पडते. एकाद्या विषयलोलुप गिधाडानें एकाद्या तरुणीवर हल्ला केला तर त्या बिचारीनें करावें तरी काय ! ती रडेल ती आरडेल ! पण तिच्या त्या केविलवाण्या हृदयद्रावक करुण किंकाळ्या ऐकतो कोण ? मुंबईसारख्या शहरीं बळजबरीनें धरून आणलेल्या हतबल तरुणींना एकाद्या दरवडेखोराप्रमाणें गर्जाच्या बंदिखान्यांत अडकावून टाकून त्यांच्या शरीरावर व्यापार करण्यांत येतो, अशा पुष्कळ गोष्टी उघडकीस आलेल्या आहेत !

समाजसुधारकांनों ! अगोदर इकडे लक्ष द्या. राजकीय पुढाऱ्यांनों ! प्रथम ह्या पतित तारकांना आधीचा तारता हात द्या ! ब्रह्ममय धर्माधिकाऱ्यांनों अशा दुर्दैवी देवतांचा अगोदर उद्धार करा !

विमल एकदम खालीं पडली. त्या बरोबर मोहनला हर्षवायु झाला. भोंवताली चिटपांखरूही दिसत नव्हते. तो खालीं वांकला. त्यानें विमलेच्या तोंडाकडे न्याहाळून पाहिलें. आतांपर्यंत आपण कोणत्या तरी तरुणीला पकडलें एवढेंच त्यांना वाटत होतें. पण मोहनानें विमलेला पूर्वी पाहिलें होतें. ती एका ब्राह्मणाची मुलगी आहे हें त्याला माहीत होतें. 'आपण पकडलेली तरुणी ब्राह्मणाची आहे' हें पाहून त्याला स्वर्ग तीन बोटें उरला त्यानें एक विकट हास्य केलें. 'सर्जा ! आजचें सांवज नेमकें ब्राह्मणाचें सांपडलें आहे. आतां मजा करतों बघ !' असें म्हणून विमलेच्या पवित्र ओठावर आपले ओठ टेकण्यासाठीं आपलें—अपवित्र थोबाड पुढें केलें. तत्क्षणींच विमल भानांवर आली. ती एकदम उठून बसली. तिनें पुन्हां एक किंकाळी फोडली. याच वेळीं दोन तरुण विद्यार्थी त्या जागेजवळ आले. त्यांना पहातांच कामांध मोहन 'ए × × कोन हे तुम्हीं ?' असें त्यांचे अंगावर खेंकसा 'अरे मला सोडवा' असें अस्पष्ट उच्चार विमलेच्या तोंडून बाहेर पडले. पण दुर्दैव त्या बिचारांचें कीं मोहनानें दरडावतांच, व नान्या आणि सर्जा यांच्यासारखें काडिपैलवान अंगावर धांवून आल्याचें पाहतांच त्या दोन तरुणांनीं धूम ठोकली. बिचाऱ्यांच्या धोतरांचा रंग बदलला कीं काय न कळे !!

वा रे कॉलेजांतले तरुण ! एका असहाय्य दीन भगिनीवर अत्याचार होत आहे हें पाहून हें तरुण पळत सुटले. यांना तरुण तरी कसें म्हणावें ? मायभगिनींना संकटमुक्त करण्यासाठीं प्रत्येकानें प्राणार्पण करण्यास तयार व्हावयास नको काय ? तसें न करतां जर हें तरुण पळत सुटताल तर ते जिवंत असून फायदा काय ? पण नाहीं, अद्याप सारेच तरुण इतके नामोहरम झालें नाहींत !

ते दोघे शूर पळून गेलेले पाहतांच मोहनाला आणखीच हुरूप आला विमलेनें पुन्हां एकदां हंबरडा फोडला. तो ऐकतांच सर्जा म्हणाला, 'मोहना !

आतां इथें फार वेळ थांबण्यांत अर्थ नाहीं. चल हिलाच गाडींत घालून माझ्या माडीवर घेऊन जाऊं.' सर्जाचा हा विचार मोहनला पसंत पडला. तेवढ्यांत विमल पळून जाऊं लागली, मोहननें धांवत जाऊन तिला घट्ट धरलें, विमलेची अवस्था आतां मात्र फार कठीण झाली, तिला ग्लानी आली. तिचे डोळे गेले तिचा तोल सुटला पण तेवढ्यांत तिला तशीच हातांत धरून मोहनानें आपनें आपले ओठ तिच्या गालाला भिडविण्याचा प्रयत्न केला! तो पुढें वांकलाच तो पुढें वांकलाच तोंच त्याच्या पाठींत असा एक लत्ताप्रहार बसला कीं त्यासरशी मोहन तीन ताड लांब उडाला विमल धाड-कन खालीं पडली. तिचें कपाळ एकदम रस्त्यावर आदळल्यामुळें तें ठेंचून निघालें. तिची मूर्च्छा कायमच होती.

विमलेच्या सहाय्याला धांवून आलेला तरुण धांवतच व्हिक्टोरियाजवळ गेला. व्हिक्टोरियावाला लांबूनच ही अंधारांतली चकमक पहात होता. त्यानें आपल्या खिशाबरोबरच तोंड बंद करून घेतलें होतें. विमलेच्या सहा-य्यकर्त्या तरुणानें व्हिक्टोरियांतला चाबूक ओढून घेतला. त्यानें प्रथम पहिला तडाका व्हिक्टोरियावाल्याच्या पाठीवर लगावला. आतां प्रसंग ठीक आहे हें पाहून व्हिक्टोरियावाल्यानें घोडा चौफेर काढला. थोड्याच वेळा-पूर्वी दोन तरुणांना पळवून लाविल्यानें सर्जा व नान्या यांस आपण शूर आहोंत असें वाटूं लागलें होतें. ते दोघेही एकदम त्या शूर तरुणाचे अंगा-वर धांवून गेले. चार हात लांब जाऊन गटारांत पडलेला मोहनही आतां उठण्याची तयारी करीत होता. परंतु तो नवा तरुण डगमगणारा नव्हता. त्यानें एकदम तो चाबूकच लाठीसारखा फिरविण्यास प्रारंभ केला व चाब-काच्या दांड्याचे दोन दोन तडाके बसतांच सर्जा व नान्या ह्यांनीं पळवाट धरली. तेवढ्यांत त्या तरुणाचें लक्ष धडपडत उठणाऱ्या मोहनाकडे गेलें. त्याची मानगूट धरून त्या शूर वीरानें मोहनाकडे न्yहाळून पाहिलें. तों तो चकित झाला. 'कोण मोहन ?' असे आश्चर्योद्गार त्याचे मुखांतून बाहेर पडले. त्यानें लागलीच मोहनाची मानगूट सोडली. सर्जा व नान्या पळून गेलेले पाहतांच मोहनानेंहि सुटका होतांच पळ काढला. पण मोहनानें त्याचा बेत हाणून पाडणाऱ्या त्या नव्या शूराला ओळखलें असावेंसें दिसतें.

कारण पळतां पळतां ' तुम्ही आहांत काय बच्चमजी ! बरें आहे पाहून घेईन ' असें तो पुटपुटत होता.

सर्वांचा निकाल लावल्याबरोबर हातांतला चाबूक खालीं टाकून तो तरुण विमलेजवळ गेला. विमल पुरी मूर्छित झाली होती. आतां काय करावें ? अशी त्या तरुणास क्षणभर विवंचना पडली असावी. पण मात्र ती क्षणभरच. तो एकदम जवळच असलेल्या नळावर धांवला. विलासपूरच्या म्युनिसिपालटीनें बरेच ठिकाणीं असे सार्वजनिक नळ घेतलेले होते. पळतांना त्याच्या पायानें एक लहानसें गाठोडें दूर उडालें, तें त्या पळालेल्या तरुणाचें होतें. विमलेला सोडविण्यासाठीं म्हणून तो धांवून आला होता. अर्थात ज्या तरुणीची आपण महत्सकटापासून सुटका केली त्या तरुणीचें नांव ' विमल ' असेल अशी त्याला कल्पना नव्हती. मोहनाच्या पाठींत तडाखा लगावतांच त्या तरुणाच्या हातून तें छोटें गाठोडें खालीं पडलें होतें.

मोहन सर्जा व नान्या यांनीं हुसकावून लावलेल्या पहिल्या त्या दोन पळपुट्या भित्र्या तरुणांनीं मात्र एक फुकाचा घोंटाळा करून ठेवला. ते दोघे पळतच जवळच्या म्हणजे वरील प्रकार घडला तेथून अर्ध्या मैलावर असणाऱ्या एका पोलीस चौकीवर गेले, व त्यांनीं तेथील शिपायास सारी हकिगत बावऱ्या घाबऱ्या सांगितली. शिपायानें टेलिफोन करून मुख्य चौकीवरून चार दोन शिपाई बोलावले. जणूं काय शिपायांची जमवाजमव होईपर्यंत कोणी पळून जाणें अशक्य होतें ! ! विलासपुरांतल्या पोलिस शिपायांची अशीच मौज होती. अपघात घडल्यावर किंवा चोर पळून गेल्यावर पोलीसाची स्वारी बहुधा हजर होत असे. मग मात्र चवकशीचा असा धडाका सुरू होई कीं चोराऐवजीं ज्याच्या घरीं चोरी झाली असेल त्याच्याच नाकीं नऊ येत. एकदां अशीच एक चोरी विलासपूरांत झाली असतां पोलिसांनीं शोधाचा धडाका सुरू केला. सुमारें दहा वर्षें या तपासांत निघून गेलीं आणि शेवटीं खरा चोर मेल्यावर पोलिसांनीं त्याच्यावर पकडवारंट बजावलें.

एका जमादारानें तर मृत चोराच्या निर्जीव हातांतच लोखंडी बेडी अडकवून दिली. दुसऱ्या जमादारानें, चोर चौकीवर येण्यास नाखूष आहे

असें समजून, त्याच्या मृतदेहावरच दंडुका उगारला. एक पोलीसनें तर ‘ चल, अजून तुला सोडून देतों, पण काय चिरिमिरी देशील बोल ?’ असा त्या निर्जीव शरिरावर प्रश्नांचा भडिमार करून सोडला. सरतेशेवटीं बऱ्याच वेळानें पकडलेला आरोपी मेला आहे असें जेव्हां त्याला समजलें तेव्हां त्यानें तेथून पाय काढला ! !

नळाचें पाणी आणून ओंजळींत भरून तें त्या तरुणानें विमलेच्या तोंडावर शिंपडलें. आतां अंधार बराच पडला होता. तेवढ्यांत एक मोटार भर वेगानें धांवत येऊन निमिषांत निघून गेली. त्या मोटारीच्या दिव्यांचा उजेड विमलेच्या तोंडावर पडला. उजेड क्षणमात्रच पडला खरा पण त्यामुळें तो तरुण चरकला. त्यानें विमलेला पूर्वीं बरेच वेळां पाहिलें होतेंसें दिसलें. पाणी तोंडावर पडतांच विमल थोडी भानावर आली ‘ कोण आहे तें ? ’ असे क्षीण उद्गार तिनें उच्चारले, ‘ मी मी यशवंत देशमुख’ असें त्या तरुणानें दिलेलें उत्तर तिच्या कानांत शिरलें. ती पुन्हां बेभान झाली. ‘ एकूण ते बूट हिचेच तर ’ असें पुटपुटत यशवंतानें आणखी एक ओंजळभर पाणी विमलेच्या तोंडावर शिंपडलें. इतक्यांत हातांत दिवे घेऊन धांवत येणारे चार इसम त्याच्या दृष्टीस पडले. यशवंताला आपल्या मदतीस माणसें आलीं असें वाटलें. तो उठून उभा राहिला.

पण विधिघटना कांहीं निराळी होती.

धांवत येणाऱ्या पोलिसांत एक जमादारही होता. त्यानें एकदम यशवंतालाच धरलें. दुसऱ्याच क्षणीं यशवंताच्या हातांत लोखंडी साज चढला ! !

‘ अरे मला कां उगाच धरतां ? ’ हे त्याचे शब्द जणूं काय त्या पोलिसांच्या कानींच पडले नाहींत. आणि दुर्दैवी परिस्थितीही यशवंताच्या नशिबाची परीक्षा पाहात होती. मोहन, सर्जा व नान्या हे पळत पळत परत जात असतांच त्यांना समोरून पोलिस दिसले. तेव्हां प्रसंगावधान राखून मोहनानें पोलिसांना ‘ अरे पळा, अजूनही तो पळाला नाहीं ’ असे शब्द उच्चारून भलत्याच मार्गी लावलें. त्यांतला एक पोलीस शिपाई तर सर्जाच्या ओळखीचा होता. पोलिस धांवत आले. तेथें उभा असले-

कांच तरुण अपराधी आहे अशी ठाम समजुत करून घेऊनच ते धांवत आले होते ! !

पोलिसांच्या मागोमाग आलेली मोहन, सर्जा व नान्याची तिक्कल नजरेस पडतांच सारा प्रकार यशवंताच्या ध्यानांत आला. ' याच लोकांनीं पोलिसांचा ग्रह दूषित केला आहे, आतां आपण कांहीं जरी बोललों तरी तें यांना खोटेंच वाटणार ' असें यशवंताला पक्कें कळून चुकलें.

मुख्य जमादारानें एका पोलिसास पळत जाऊन गाडी घेऊन येण्यास सांगितलें व तो विमलला शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न करूं लागला. दुसऱ्या एका शिपायाची नजर जवळच पडलेल्या गाठोड्याकडे गेली. तेवढ्या अवधींत मोहन अगदीं यशवंतजवळ आला व मुद्दामच आश्चर्य दाखवून म्हणाला ' आं ! कोण यशवंत ? आणि तूं या मुलीवर असा हल्ला केलास काय ? बाकी जातीच्या हलकटांची कृत्येंहि अशींच असायचीं ! ' मोहनाचे हे उद्गार ऐकून यशवंताचा राग अनावर झाला. चोराच्या या उलट्या बोंबा ऐकून त्याचें मस्तक फिरून गेलें. पण तो आतां करील काय. तो आतां एक बंदीवान होता. बंदीवानाला मानापमानाची जाणीव असणें योग्य नाहीं असा या जगाचा कठोर नियम आहे. यशवंत एक अक्षरही बोलला नाहीं. तो सारा प्रकार मुकाट्यानें पहात होता. थोड्याच वेळांत गाडी येऊन विमलेस हॉस्पिटलमध्यें व यशवंतास चौकीवर नेण्यांत आलें ! भवितव्यता अशी चमत्कारिक असते हेंच खरें ! !

## प्रकरण आठवें.

## " गंगू पवार ! "

वसंत सुंदरच्या खोलींतून निघून गेला आणि लागलीच गंगू पवार सुंदरच्या खोलींत शिरली. आज बराच वेळ ती सुंदरच्या खोलीवर नजर ठेवून होती. बरोबरच आहे. पापी लोकांना जगही पापीच दिसावयाचें. कावीळ झालेल्या प्राण्याला सारें विश्व पिवळें आहेसें वाटणारच. वसंत सुंदरच्या

खोलींत आला त्याबरोबर सुंदरनें दार लावून घेतलें हें वाचकांना स्मरत असेलच. परंतु या साध्या ' दार लावण्याचा ' अर्थ पापी हृदयाच्या गंगूसारख्या पतित तरुणीला निराळा वाटावा यांत नवल नाहीं. ' आज आपण सुंदरला खाशी पकडली ' अशा ऐटीनें तिनें आपली नजर सुंदरच्या दारावर लावली होती. सुंदरच्या खोलींत गेलेला तरुण कोण होता ? त्याची व सुंदरची पूर्वीपासून ह्मणजे अगदीं लहानपणापासून ओळख होती किंवा काय वगैरे विचार करण्याचें गंगूला मुळींच महत्व वाटलें नाहीं. सुंदरच्या खोलींत सायंकाळच्या वेळीं एक तरुण येतो व तीं दोघे अंधार पडेपर्यंत दार लावून बोलत बसतात, एवढ्याच भांडवलावर गंगू पवारनें पापी कल्पनांचा मोठा डोलारा रचला !

प्रत्येक समाजांत गंगू पवारसारख्या उपद्यापी पतित लोकांना साध्या गोष्टीवरून फाजील कल्पनांचे बंगले उठविण्याची फार हौस असते. एकादी तरुणी एकाद्या तरुणाबरोबर रस्त्यांतून गेली कीं पुरे, त्यांच्या पापी विचारांना लागलाच ऊत येऊं लागतो. मग ती तरुणी त्या तरुणाची बहीण असो अगर त्यानें देवाब्राह्मणांसमोर शपथपूर्वक मंगलमाळ घातलेली पत्नी असो, या कुटाळक्यांना तें त्यांचें एकत्र चालणें बोलणें अनीतिमूलक वाटूं लागतें. ते त्या गोष्टीचा आपल्या कल्पनांचें रसदार रूप देऊन, गांवभर बोभाटा करतात. कित्येक वेळां लोकापवादाचें मूळ अशाच कुटाळकींत गाडलेलें दृष्टीस पडतें.

गंगू पवार एकदम सुंदरच्या खोलींत शिरली, तिच्या मनांत त्यावेळीं केवढें हलाहल भरलेलें होतें हे बिचाऱ्या सुंदरला काय बरें माहीत ? सुंदरचें मन निष्कलंक होतें. तें एकाद्या लहान मुलाप्रमाणें अननुभवी होतें. ' ये गंगू बैस, ' असें म्हणून सुंदर दिवा लावूं लागली. दिवा लावतांच त्या छोट्या अस्ताव्यस्त खोलींत जिकडे तिकडे लख्खन उजेड पडला. गंगूनें आपले डोळे खोलीभर फिरविले, तिच्या कल्पनांना पुष्टी देणारें दृश्य तिच्या एकदम नजरेस पडलें तिचा आनंद गगनांत मावेना !

सुंदरचा बिछाना अस्ताव्यस्त होता, त्याच्याबरोबर पांघरुणाचा बोळा खालीं जमिनीवर पडला होता. बिछान्याजवळच परंतु जमिनीवर सुंदरच्या

विस्कटलेल्या अंबाड्यांतील एक फूल पडलेलें असून त्याच्यावर पाय पडल्यामुळें त्याच्या पाकळ्या विलग झालेल्या दिसत होत्या. बिछान्यावरील चादरीवर सुंदरच्या हातांतल्याच वाढविलेल्या दोन रंगित बिलोरी बांगड्यांचे तुकडे पडलेले होते. गोविंदाग्रजाच्या वाग्वैजयंतीचें पुस्तक असेंच खालीं पडलें असून आंतील कांहीं पानें मुडपून गेलेलीं स्पष्ट दिसत होतीं आणि ह्या सगळ्या साजाला पूर्तता देण्यासाठीं म्हणूनच कीं काय शर्टच्यावरून पण कोटाच्या आंत असा घालण्यासाठीं केलेला एक स्कार्फ—रंगीत गळपट्टा—बिछान्यावर पडलेला होता ! !

गंगू पवारसारख्या पापिणीला एवढी सामुग्री मिळाल्यावर आणखी काय हवें? 'आज सुंदरला कशी पण पकडली !' अशा अर्थाच्या छद्मी हास्यमुद्रेनें तिनें सुंदरकडे पाहिलें. ही आज अशा चमत्कारिक मुद्रेनें आपणांकडे कां पाहते ? याचा अर्थ सुंदरच्या ध्यानांत येईना.

'बस बस गंगू ! बस कीं तिथें' स्वतः एका खुर्चीवर बसत बसत सुन्दर म्हणाली.

'अग बाई ! नको ग नको ! मी कशाला आणखी या पलंगाला विटाळूं !' असें म्हणत व कुत्सित बुद्धीनें मोठ्यानें हंसून गंगू खरोखरच खालीं फरशीवर बसली. सुंदरला हें चमत्कारिक वाटलें. 'आज ही अशी काय बोलते ! अशी खालीं जमिनीवर काय बसते ?' हें सुंदरला समजेना. ती अधिकच बुचकळ्यांत पडली.

'काय ग सुंदर ! चहा झाला का तेवढ्यांत ! अन् हा कप आज तुझा नेहमींचा दिसत नाहीं. पाहूं पाहूं बरं कसा आहे तो !' असें म्हणून गंगूनें बसल्या बसल्याच पुढें सरकून, वसंत ज्या कपांतून चहा प्यायला होता तो कप हातांत घेतला. तो कप नवा आणलेला असून त्यावर Love me अशीं सोनेरी अक्षरें होतीं. सुंदरनें तो वसंताला चहा देण्यासाठीं मुद्दामच आणला होता. कपावरची ती सोनेरी अक्षरें वाचून तर गंगूला हर्षवायु होण्याचा रंग दिसूं लागला. 'अग बाई ! कुणावर जडली आहे तुझी लव्ह ?' असा प्रश्न गंगूच्या मुखांतून बाहेर आल्याविना राहिला नाहीं.

हा प्रश्न ऐकून तर सुंदर फारच ओशाळली. एकाद्या सौभाग्यकांक्षिणीला तिच्या प्रेमाबद्दल असा कोणी चमत्कारिक प्रश्न विचारला तर ती अशीच

लाजून जाते. अशी लाज म्हणजेच तरुणींचा गुलाबी साज ! ही लाज हेंच तरुणीचें सौभाग्य आहे. अशी लाज म्हणजेच कुमारिकांचें गोंडस पावित्र्य होय ! एकाद्या तरुणीला कोणी तिच्या भावी पतीचें नांव विचारलें म्हणजे ती जशी एकदम भांबावून जाते तशीच स्थिती आतां सुंदरची झाली !

प्रेमाचा प्रेमी प्रश्न निघाला म्हणजे साऱ्या तरुणी अशाच लाजतात, त्या अशाच गोंधळून जातात, त्यांच्या हृदयाला अशाच प्रेमी गुदगुल्या होऊं लागतात. कुमारिकांना त्यांच्या भावी जिवलगाच्या नांवाबद्दल कोणी पृच्छा केली कीं त्या लाजतात, विवाहित तरुणींना पतीचें नांव घेण्यास कोणी सांगितलें कीं त्या अशाच माना खालीं घालतात ! !

' काय ग कुणावर बसली आहे तुझी लव्ह ? ' हा गंगूचा प्रश्न ऐकतांच सुंदर क्षणभर गुंग झाली. असा प्रश्न आज तिच्या कानीं प्रथमच पडत होता. ती किंचित ओशाळली, तिचे डोळे आपोआप मिटले गेले, तिच्या मिटलेल्या डोळ्यांसमोर तिच्या वसंताची रम्य मूर्ती रंगूं लागली.

पण ह्या स्वाभाविक परिणामाचा अर्थ गंगूनें भलताच केला. तिचा ग्रह अगदीं दूषित असल्यामुळें सुंदरच्या खोलींतील प्रत्येक प्रकार तिला तिच्या कल्पनांना पुष्टिकारक वाटूं लागला. ' आपण हिचें वर्म ओळखलें व म्हणूनच ही भांबावली ' असें गंगूला वाटलें. गंगूच्या पापी मनाला अत्यंत समाधान वाटलें. आपल्या शेजारच्या खोलींत राहणारी मैत्रीण थेट आपल्याच वळणाची आहे असें वाटून–वाटूनच काय पण तिच्या समजाप्रमाणें खात्री पटून–तिला बरें वाटलें.

' सुंदर ! आतां पुरे ही लपवालपवी, मला हा सगळा प्रकार समजला. माझ्यापासून कांहीं लपवून ठेवणें हें तुला शक्य नाहीं, पण सांभाळ ग बाई नाहीं तर ही तुझी लव्ह पाघळून चांगलीच तोंडघशीं पडशील. '

' गंगूचें हें बरळणें ऐकून मात्र सुन्दर भानावर आली, गंगूनें साऱ्या प्रकाराचा विपरीत अर्थ केला हें गंगूच्या आत्तांच्या भाषणावरून प्रथमच तिच्या ध्यानांत आलें. सुंदर जोरानें म्हणाली, 'काय हें बडबडतेस तूं गंगू !'

' कांहीं नाहीं, म्हटलं असल्या कामांत जरा जपून असावं तें बरं ! ' गंगूनें उत्तर दिलें.

'असल्या' ह्या शब्दाचा उच्चार करतांना गंगूनें पाजीपणानें बिछा-न्याकडे खूण केली होती. एका क्षणांत सुंदरला गंगूच्या पापी कल्पनांची पुरेपूर कल्पना आली. ती ताडकन खुर्चीवरून उठली, ती संतापानें लाल-भडक झाली. तिच्या डोळ्यांतून जणूं काय विस्तवाच्या ठिणग्याच उडताहे-तसें वाटलें. 'गंगू! काय म्हणालीस? असल्या म्हणजे काय ग वाटलें तुला? तुझ्या या बोलण्यावरून तूंच पापी आहेस असें मला वाटूं लागलें आहे. गंगू! तूं इतकी पापिणी असशील अशी माझी कल्पना नव्हती. माझ्या प्रेमाबद्दल तुझ्या मनांत कांहीं काळेंबेरें आलें असावेंसें दिसतें. पण मला त्याची पर्वा नाहीं. जा, गंगू अगोदर माझ्या खोलींतून चालती हो. जातेस कीं नाहीं?'

सुंदर शरिरानें सुदृढ होती हें मागें सांगितलेलेंच आहे. गंगू पवारची शरीरयष्टि जरा जोराच्या वाऱ्याबरोबर कोणीकडच्या कोणीकडे उडून जाईल अशी होती. आणि नेहमींच्या ठरावीक सिद्धांताप्रमाणें गंगू पापी होती व भित्रीही होती. आपल्या बोलण्यानें सुंदर एकदम इतकी रागवेल हें तिच्या ध्यानींमनींहि नव्हतें. उलट सुंदर आपल्याला साऱ्या गोष्टी स्पष्टपणें सांगेल असें तिला इतका वेळ वाटत होतें. सुंदर रागावली हें पहातांच गंगू घ्याली. पण ती प्रसंगावधानी होती. सुंदरला शांत करण्यासाठीं तिनें एक फारच बेमालूम तोड काढली. गंगूनें एकदम सुंदरचे पाय घट्ट धरले. 'सुंदर सुंदर' खांदे उडवून, हुंदके देण्याचा नाटकी अविर्भाव आणून गंगू म्हणाली, 'सुंदर! अशी रागावूं नकोस. मला बाई तुझी फार भीति वाटते. तुझ्या-बद्दल माझ्या मनांत काळेंबेरें असणें शक्य तरी आहे का? सुंदर! सुंदर, तूं माझी बहीण आहेस. तुला दुखविण्यापूर्वी मी गळफांस लावून घेईन.

गंगूला ह्या वेळीं इतका उत्कृष्ट अभिनय साधला कीं मोठमोठे नांवाज-लेले नटही त्यापुढें तुच्छ होत. सुंदरला हा खोटेपणा कसा कळणार? तिचा राग एकदम थंड झाला. उलट हिच्यावर आपण विनाकारण आग पाख-डली असें वाटून सुंदरला वाईट वाटलें. सुंदर धीट होती तितकीच ती हळव्या मनाची होती. गंगूच्या अपवित्र मूर्तीच्या ठिकाणीं सुन्दरला विमलेची पवित्र मूर्ती दिसली. तिचें हृदय कळवळलें. तिच्या डोळ्यांत पाणी आलें.

तिनें गंगूला वर उठवली. ' गंगू ! गंगू ! तूंच मला क्षमा कर, मी तुझ्यावर एकदम अशी कशी रागावलें हेंच मला कळत नाहीं. आज माझ्या हातून अशाच चुका घडत आहेत. सर्वांशींच विमल आली होती तिनें मला दार उघडण्यासाठीं फार विनविलें, पण मी तिच्यावर तिनें आज माझा पराभव केला म्हणून रागावलें असल्यामुळें दार उघडलें नाहीं. '

आपला डाव बरोबर साधलासें पाहून गंगूनें डोळे पदरानें पुसून टाकले. नंतर दोघीही बिछान्यावर बसल्या.

' सुंदर, आतां तुझा राग शांत झाला ना ? छेः बाई विलक्षणच तापट मुलगी आहेस तूं ! तुझे ते लाल डोळे पाहतांच माझी तर पांचावर धारण बसली. सुंदर ! यापुढेंही जरी एकादे वेळेस मी चुकून एकादा वेडावांकडा शब्द बोललें तरी तूं मला उदार अंतःकरणानें अशीच नेहमीं क्षमा करशील ना ? '

' गंगू ! अग तुला क्षमा करणारी मी कोण ? मी काय कुणी देवता आहें कीं काय ? '

' सुन्दर ! तूं कांहीं म्हण पण मला तर तूं अगदीं देवता आहेस असंच वाटतं. सुन्दर ! आतां वेळ आलीच म्हणून सांगतें, तुझ्यावर माझें अगदीं बहिणीसारखें नितांत प्रेम आहे. तुझी व माझी कॉलेजांत गांठ पडली त्या दिवसापासूनच तूं माझी बहीण आहेस असें मला वाटूं लागलें. हें सर्व तुझ्यासमोर बोलण्याचा मला संकोच होई. पण आज मी माझें खरें खरें अंतःकरण तुझ्यासमोर उघड केलें आहे. सुन्दर ! तूंहि मला तुझ्या विमल-प्रमाणेंच जिवलग मैत्रीण समजशील ना ? '

गंगूचें हें मायावी भाषण सुंदरच्या भोळ्या मनाला पटलें, तिला गंगूबद्दल आदर वाटूं लागला.

' गंगू ! मी उद्यां विमलला चहाला बोलावणार आहें, तेव्हां तूंही ये. तुझें खरें हृदय समजूं दे. गंगू, विमल फार गोड मुलगी आहे. ती माझी तर जिगर मैत्रीण आहेच. तशीच ती तुझीहि मैत्रिण व्हावी अशी माझी इच्छा आहे. '

' होय गडे ! सुंदर, तुझ्या विमलबद्दल मला फार आपलेपणा वाटतो, '

गंगूच्या मानभावी व वरपांगी भाषणाचा अर्थ सुंदरला कळणें शक्य नव्हतें. थोड्या वेळानें जेवणाची घंटा झाल्यावर गंगू आपल्या खोलींत गेली. सुंदरलाही क्लबांत जेवावयास जावयाचें होतें. गंगू गेल्याबरोबर धांवत जाऊन सुंदरनें बिछान्यावरचा स्कार्फ हातांत घेतला. थोड्याच वेळापूर्वी आलेल्या वसंताचा तो स्कार्फ होता. तो तो चुकून तेथेंच विसरून गेला होता. त्या स्कार्फला हात लावतांच सुंदरच्या अंगावर प्रीतीचा कांटा थरारला. तिनें तो स्कार्फ स्वतःच्या गळ्याभोंवती गुंडाळतांच तिला एक नामी कल्पना सुचली. ' होय ! उद्यां नाहींतर आज रात्रीं प्रथम तेंच काम केलें पाहिजे, ' असें पुटपुटून स्फार्फ गळ्याभोंवतीं तसाच कायम ठेवून, दिवा बारीक करून ती जेवणासाठीं क्लबाकडे वळली ! !

---

## प्रकरण ९ वें

# " बिचारा बंदिवान ! "

तो आतां बंदिवान होता. जगाच्या दृष्टीनें तो आतां एक भयंकर गुन्हेगार होता. तेव्हां तो जें जें काय बोलेल तें तें सर्व खोटें असावयासच पाहिजे. त्याला चौकींत नेऊन बसविण्यांत आलें. त्याच्याभोंवतीं दोन पोलीस त्याची थट्टा करीत बसले. प्रथम एकदां यशवंतानें ' मी निरपराधी असून माझ्यावर अपराध लादणारे लोकच खरे अपराधी आहेत ' असें त्यांस सांगून पाहिलें. पण हें त्याचें भाषण ऐकून ते दोन पोलीस तर दांत काढून खदखदां हांसू लागले. यशवंत स्वतःचा अपराध लपविण्यासाठीं ह्या थापा देत आहे अशी त्यांची ठाम समजूत झाली. त्यांचें तें हंसणें यशवंताच्या हृदयाला फारच झोंबलें.

तेवढ्यांत दुसऱ्या शिपायानें यशवंताच्या हातून पडलेलें तें छोटें गाठोडें सोडलें. आंतून विमलच्या पायांतलेच बूट निघाले. त्या बुटावर ' विमल ' अशीं अक्षरें आंतील बाजूस लिहिलेलीं होतीं. ते बूट ज्या हातरुमालांत

गुंडाळले होते तो हातरुमाल यशवंताचा होता. कारण त्याच्या एका कोपऱ्यांतलीं ' य. दे. ' अशी दोन अक्षरें स्पष्ट लिहिलेली होती. बिमल रस्त्यांत आडवी पडली आहे. जवळच यशवंत उभा आहे, अशा परिस्थितींत यशवंतावांचून अन्य कोणी अपराधी आहे असें समजावें तरी कसें ? बरें विमलेची जबानी घ्यावी म्हटलें तर ती गैरशुद्धींत. तोपर्यंत यशवंताला सोडून देणेंही कायद्याच्या दृष्टीनें गैर होतें. पोलिसांची तर यशवंतच खरा अपराधी आहे अशी खात्री झाली होती. एका पोलिसाचा एक जिगर दोस्त म्हणजे सर्जा तर छातीला हात लावून ' यशवंतासारखाच एक तरुण त्या बालिकेचा हात धरण्याचा प्रयत्न करीत असल्याचें मी पाहिलें ' असें सांगण्यास कचरत नव्हता ! मग यशवंत अपराधी कसा नाहीं ?

हातरुमालांतील बूट बाहेर निघतांच पोलिसांचा ग्रह जास्तच कायम झाला. ह्या वेळेस खरी वस्तुस्थिती काय होती हें सांगण्याची यशवंताला एकदां इच्छा झाली, पण ' खरी गोष्ट सांगून कांहीं एक फायदा न होतां उलट आपण कांहीं तरी मुद्दामच खोटें सांगत आहों असा यांचा समज होईल ' असें त्याच्या ध्यानीं येतांच तो चूप बसला.

खरी गोष्ट कांहीं निराळीच होती. यशवंत फिरावयास निघाल्यानंतर आपल्या नेहमींच्या एकांत झाडाखालीं बसला. बऱ्याच वेळानंतर घरीं परत फिरण्याची वेळ झाल्यामुळें तो उठला. जरा चालून गेला असेल नसेल तोंच त्याला दोन उत्तम कमावलेल्या कातड्याचे उंच टाचेचे बूट दिसले. विमलेनें फेकून दिलेले ते हेच बूट होत. बूट पाहतांच आपण आपलें तसेंच पुढें निघून जावें, आपल्याला या बुटाशीं काय करावयाचें आहे ? असा एक विचार यशवंताच्या मनांत आला. पण तो विचार फारच थोडा वेळ टिकला. त्याला वाटलें कीं एखादी तरुणी हे बूट विसरून गेली असेल. आणि म्हणूनच ते हातरुमालांत गुंडाळून घरीं घेऊन जावें असें त्याला साहजिकच वाटलें. दुसरे दिवशीं टेंकडीवर येणाऱ्या स्त्रीसमूहांत कुणाचे बूट हरवले आहेत किंवा काय याची चौकशी करावी असें त्यानें ठरविलें. पण ह्या साध्या गोष्टीचा किंचित्काल कां होईना पण केवढा घोर परिणाम होईल हें त्याच्या ध्यानींमनींही नव्हतें आणि तें असावें तरी कसें ?

खरी गोष्ट सांगितली असतां ती यांना पटणार नाहीं ह्या भावनेनें यशवंत मुकाट बसला. पण या मौनाचा त्या शिपायांनीं भलताच अर्थ घेतला. त्यांचा संशय द्विगुणित झाला आणि त्यांनीं यशवंताकडे कुत्सित नजरेनें पाहिलें. ' काय रे ! आतां इतका मुद्देमाल स्पष्ट असतां उगाच कां थापा मारतोस ?' असाच त्यांच्या त्या कुत्सित मुद्रेचा अर्थ असावा. पण त्या झपीक टाळक्याच्या शिपायांना ' हा त्या मुलीचे बूट हातरुमालांत कशाला गुंडाळील ? ' असा क्षणभरही विचार सुचला नाहीं.

पोलीस यशवंताची उनाड हेटाळणी करीतच होते, हाही ती ऐकून घेत होता. ती त्याला ऐकून घ्यावी लागत होती. तो आतां बंदिवान होता. मनांत येतील ते विचार मग ते कितीहि खरे असोत, बंदिवानानें बोलावयाचे नसतात. कान असून बंदिवानानें ऐकावयाचें नसतें, डोळे असून बंदिवानानें पाहावयाचें नसतें, बंदिवान तो बंदिवान ! ! मग तो खरा अपराधी असो वा नसो. बंदिवानानें नाना तऱ्हेचीं उपमर्दकारक बोलणीं मुकाट्यानें ऐकून घेतलीं पाहिजेत. त्याची वाटेल तितकी अवहेलना झाली तरी त्यानें रागावतां कामां नये ! त्यानें तोंडांतून एक चकार शब्द काढतां कामां नये. अधिकाऱ्यांनीं लाथाबुक्यांनीं तुडविलें, चाबकानें बडविलें तरी बंदिवानानें ते निमूटपणें सोसलें पाहिजे. मनांतल्या मनांत दीन बंदीवानानें कितीहि चरफडावें त्याला विचारतो कोण ? एकाद्या नागाला कांचेच्या कपाटांत कोंडून ठेवलें कीं हवा जाण्यासाठीं म्हणून ठेवलेल्या छिद्रांतून बारीक काड्या घालून लहान सहान पोरेंसोरें सुद्धां त्याला मनसोक्त छळतात. हा छळ त्या फणीन्द्राला गुपचुप सहन करणें क्रमप्राप्त असतें. कारण तो पडला बंदिवान ! वाघाला एकदां पिंजऱ्यांत कोंडला कीं भेकड कोल्हींकुत्रींसुद्धां त्याची फजिती करूं लागतात ! बंदिवानाचें नशीबच असें कठोर असतें. वनराज केसरी रानांत मोकळा असतांना स्वैर गर्जना करून मन मानेल तिकडे डौलानें फिरतो. लहान-सहान डुकरेंच काय पण मदोन्मत्त हत्तीसुद्धां त्याच्यासमोर उभे राहणें अशक्य असतें पण इतका दरारा असणारा हाच सिंहराज एकदां सांपळ्यांत अडकून बंदिवान झाला कीं सर्व खेळ आटोपला. मग ती त्याची गर्जना, तो त्याचा डौल सारें सारें कवडीमोल होऊन जातें. कच्चीं-

बच्ची पोरेंसुद्धां त्याला खडे मारून खिजवूं लागतात. पण तो करतो काय ? बंदिवान तो बंदीवान हेंच खरें ! हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचें ढोलदार निशाण जोंपर्यंत थाटानें फडकत होतें तोंपर्यंत त्याची अवहेलना करण्याची कोणाची प्राज्ञा नव्हती. पण तीच पुण्यश्लोक भारतमाता आतां बंदीवासांत पडली असतां मिस मेयोसारख्या उनाड पोरीसुद्धां हिची मन मानेल तशी निंदा करीत आहेत. अभागी हिंदुस्थाना ! तुझ्या ललाटीं आणखीं किती हालअपेष्टा आहेत तें एका सर्वव्यापी परमेश्वरालाच माहीत ! बंदिवान तो बंदिवान, दास ते दास, जित ते जित !

यशवंत आतां बंदिवान होता. सारी रात्र त्याला चौकींत बसून काढावी लागली. ती रात्र म्हणजे यशवंताच्या धैर्याचें एक भयंकर दिव्य होतें. त्या रात्रीं झोंप लागणें अशक्य होतें. मध्यें एकदां एका पोलिसानें चार मूठ चुरमुरे त्याच्यापुढें आणून ठेवले. यशवंताला पोलिस पहाऱ्यांत खाद्य भक्षण करणें कसेंसेंच वाटलें. तो उपाशी होता, त्याला भूक लागली होती. पण पुढें ठेवलेले चुरमुरेच कां होईनात पण ते खाणें त्याच्या जिवावर आलें. समोर ठेवलेले चुरमुरे म्हणजे जहर विषाचा पुड आहे असें त्याला वाटलें. त्यानें वीषही आनंदानें खाल्लें असतें. त्यानें आपल्या जिवाचा शेवट आनंदानें केला असता. सद्वर्तनी सच्चा मनुष्याला आपल्या चारित्र्यावर खोटा कां होईना पण एखादा आळ आलेला पाहून अत्यंत दुःख होतें. यशवंताच्या हृदयाला अशा घोर यातना होत होत्या. पण नाहीं. यशवंतानें या पापी जगाचा तूर्त तरी रामराम घेतला नसता. आपल्या चारित्र्यावरचा हा आळ खोटा ठरेपर्यंत त्याला जिवंत मरण अनुभवणें क्रमप्राप्त होतें. एकदां हा खोटा कलंक धुवून गेल्यानंतर मात्र त्यानें मोठ्या खुषीनें स्वर्गाचा मार्ग धरला असता. पण आतां जिवंत राहणें त्याला भाग होतें. चारित्र्यावरचा खोटा कलंक नाहींसा होईपर्यंत वाटेल ते हाल सोसण्यास तयार असणें अवश्य होतें. क्षणापूर्वी मनांत आलेला आत्महत्येचा गोड विचार त्यानें मागें सारला.

'मला इतक्यांतच मरतां येत नाहीं. दुर्लौकिक नाहींसा केल्याखेरीज मला इहलोकची यात्रा संपवतां येणार नाहीं. मी या जगांत आलों त्या वेळेस पवित्र होतों. व आतां जगांतून निघून जातांना मला पवित्रपणेंच

गेलें पाहिजे. माझ्या शीलावर उडालेला हा दुष्ट गहजब मला नाहींसा केला पाहिजे. जगाच्या दृष्टीनें मी अपराधी आहें म्हणूनच सत्य उघडकीस येईं-पर्यंत मला जगलेंच पाहिजे. जगाची दूषित दृष्टी साफ होईपर्यंत मला कारा-गृहवास काय पण मर्त्यभूमीवरील नर्कवासही निमूटपणें सोसला पाहिजे. खरी गोष्ट फार दिवस लपून राहणें अशक्य आहे. सत्य कस्तुरीप्रमाणें असतें. त्याचा सुगंध लपून राहणार नाहीं, मी अपराधी नाहीं हें सत्य लव-करच जगाच्या निदर्शनास येईल अशी माझी मनोदेवता मला ग्वाही देत आहे. परमेश्वर मंगलमय आहे. तो अनाथांचा नाथ आहे. तो शरणागताला अभय देणारा आहे. देवाधिदेव प्रभू पुण्यमय आहे. तो कृपानिधि माझ्यावरचें हें संकट टाळल्यावांचून कधींही राहणार नाहीं हें खास ! !

पण मग पवित्र, निष्पाप, गरीब, सालस, प्राण्यावर अशीं संकटें कां म्हणून कोंसळावींत ? मनुष्य प्राणी हा परमेश्वराचा अंश आहे ना ? मग या जगांत दुःखादि संकटांचें अस्तित्व तरी कां असावें ?

पण निष्पापांच्या धैर्याची परीक्षा पाहण्यासाठींच म्हणून परमेश्वर त्यांच्या-वर असल्या संकटांचें दिव्य टाकत असला पाहिजे. भट्टींत टाकल्यावांचून विस्तवाच्या प्रखर ज्वालांत पडल्यावांचून सुवर्णाची खरी परिक्षा होत नसते. टांकीचे घांव सोसल्यावांचून दगडाचे अंगीं देवपण येत नाहीं. मनुष्यप्राण्याला सुद्धां दुःखादि आपत्ती सोसल्यावांचून मानी मोठेपणा मिळवितां येत नाहीं. माझीही गोष्ट तशीच नसेल कशावरून ! माझ्या धैर्याची परीक्षा घेण्यासाठींच परमेश्वरानें मला या संकटांत टाकलें नसेल कशावरून ? मग मी भ्यावें कां ! नाहीं मी असल्या संकटांना भिणार नाहीं. ज्या प्रभूनें मला या संकटांत घातलें तोच माझ्या सोडवणुकीची सर्व व्यवस्था करील. छेः छेः ! असल्या संकटांना भिऊन आत्महत्येचे विचार करणें हें भ्याडाचें काम आहे ! '

यशवंताचें हें विचारसत्र सुरू होतें. अग्नीबरोबर धूर तसेंच एकांतांत विचार ! मनुष्य एकटा असला कीं त्याला हवे ते विचार सुचूं लागतात ! विचार करतां करतां त्याची नजर हातांतल्या हातकड्यांकडे गेली. तो हंसला !

सस्मित मुद्रेनेंच त्यानें जवळच पडलेल्या बुटांकडे पाहिलें, शिपायानें गांठोडें सोडलें होतें तरीही बूट अद्याप त्याच्याच हातरुमालावर पडले होते

बुटांकडे लक्ष जातांच त्याला एकदम त्या तरुणीची आठवण झाली. तिचें नांव विमल असें होतें हें त्याच्या तेव्हांच ध्यानांत आलें होतें. कारण त्यानें तिला कॉलेजांत बरेच वेळां पाहिलें होतें. एका ब्राह्मण-कुमारीच्या संकट निवारणासाठीं आपली अचानक मदत झाली ह्याबद्दल त्याला थोडा अभिमान वाटला. आपल्या हातून एक तरी प्रत्यक्ष कार्य घडलें याबद्दल त्याला आनंद झाला. विमलेची रेखीव मूर्ति त्याचे डोळ्यासमोर उभी राहिली. त्याला वाटलें कीं जणूंकाय विमल त्याच्याकडे पाहातच आहे, वाटलें कीं जणूं काय ती त्याच्याशींच बोलण्याचा प्रयत्न करीत आहे. वाटलें कीं तिची नजर याच्याच डोळ्याकडे लागली आहे, त्या नजरेंत यशवंताला करुणा दिसली. त्या नजरेंत यशवंताला पावित्र्य दिसलें. ती काल्पनिक नजर ध्यानीं येतांच यशवंताच्या अंतःकरणाला विजेचा धक्का बसल्याप्रमाणें झालें. त्याच्या हृदयाला चमत्कारिक वाटूं लागलें, त्याच्या मनःपटलावर एका क्षणांत विमलेची प्रेमी मूर्ती विराजमान झाली. त्याला चोहींकडे प्रेममय विमल दिसूं लागली त्याला ! कल्पनेच्या साम्राज्यांतील त्या विमल मूर्तीकडेच पाहात बसावेंसें वाटलें.

प्रेमाची जादू अशी जुजबी असते.

चौकींतल्या भिंतीवर टांगलेल्या घड्याळांत दोहोंचे ठोके पडले. पोलीस शिपाई आतां स्वस्थ घोरत होते. दिवा जळत होता. चौकीचें गजाचें दार मात्र बंद करुन त्यांस कुलूप घातलेलें होतें. त्या कुलपाची किल्ली एका पोलिसानें आपल्या खिशांत ठेवलेली यशवंतानें पाहिली होती. यशवंताखेरीज दुसरा कोणी आरोपी त्या ठिकाणीं असतां तर त्यानें त्या सुसंधीचा योग्य फायदा घेण्यास कमी केलें नसतें. हातांत हातकड्या होत्या तरी ढारढूर होऊन रखवाली करणाऱ्या त्या शिपायाच्या वरच्या खिशांतून दाराची किल्ली काढून घेणें अशक्य नव्हतें. पण हा विचार अस्सल बिलंदर चोराच्याच मनांत आला असता. असल्या विचारांना यशवंताच्या निर्मल मस्तकांत थारा नव्हता. तुरुंगांतून पळून जाण्याचीं कामें नामर्द भामट्यानींच करावींत. खरा निष्कलंक, परंतु केवळ नशिबाच्या वांवटळीनें बंदिवान झालेला वीर असल्या भेकड पळवाटीचा कधींही विचार करीत नाहीं.

काय वाटेल तीं संकटें आलीं तरी ती धैर्यानें सहन करण्याचा यशवंताचा दृढनिश्चय झाला होता. चौकीबाहेर अंधार पडला होता. रातकिड्यांचें भेसूर

प्रमाणें चालले होतें. मधून मधून वाऱ्याची लाट येऊन झाडांची पानें थरथरू लागत ! ! लांब अंतरावरून घुबडांचा भीषण घुघुत्कार कानीं येत होता ! !

तिहींच्या सुमारास चौकींतल्या टेलिफोनची घंटा वाजली.

---

## प्रकरण १० वें



# " मैत्रिणींची भेट ! "

---

विमलेला व्हिक्टोरियांत घालून जमादारसाहेब जवळच बसले. दुसऱ्या पोलिसांनीं यशवंताला पकडून पायींपायींच चौकीकडे नेलें. विमलेचें तरुण सौंदर्य पाहून जमादारसाहेब भलतेच खूष झाले होते. गाडी सुरू झाल्यावर त्यांनीं आपली पापी नजर विमलेच्या चेहऱ्याकडे खिळवून टाकली. व्हिक्टोरियाच्या कंदिलाचा उजेड विमलेच्या तोंडावर पडलेला होता. बिचारी आतांच एका घोर संकटांतून सुटली होती तोंच हें दुसरें संकट दत्त म्हणून उभें ! जमादारसाहेबांचें शरीर सरकारी अधिकाऱ्याच्या शुभ्र डगल्याखालीं झांकून गेलें होतें तरी त्यांचें अंतःकरण काळेंकुट्टच होतें. आपल्यासमोर एक हतभागी तरुणी असून तिला योग्य औषधोपचार करण्यासाठीं आपण दवाखान्यांत घेऊन जात आहोंत हें तो निर्लज्ज विसरला. त्याचे ओंठ विमलेच्या पवित्र ओंठांकडे ओढ घेऊं लागले.

पण विमलेचें सुदैव म्हणूनच कीं काय ती त्याच वेळीं एकदम भानावर आली व ताडकन उठून बसली व विस्फारित नेत्रानें सभोंवतालीं बघूं लागली. रंगाचा बेरंग झाला म्हणून किंचित जिरलेल्या आवाजानें जमादारानें तिला विचारलें, ' बाई शुद्धीवर आलांत का तुम्ही ! जमादाराच्या तोंडचा हा प्रश्न ऐकतांच विमलला सर्व प्रसंग एकदम आठवला व ती काकुळत्या आवाजानें म्हणाली, ' मला कृपा करून घरीं पोचवाल काय ? जमादारानें तिला तिच्या घराचा पत्ता विचारला व गाडीवाल्यास गाडी तिकडे वळविण्यास सांगितलें.

गाडी घराकडे जाऊं लागली, विमलेच्या डोळ्यांसमोरून पुन्हां एकदां तो नुकताच घडलेला प्रसंग चमकून निघून गेला. तिला एका मूर्तीचें चित्र डोळ्यांसमोर स्पष्ट दिसूं लागलें. ऐन संकटकालीं आपल्या सहाय्यासाठीं धांवून येणाऱ्या त्या व्यक्तीचें अंधुक चित्र डोळ्यांसमोर उभें राहतांच तिच्या नेत्रांत कृतज्ञतेचे अश्रू उभे राहिले. तिला आठवलें कीं त्या विघ्नहर्त्या तरुणास 'कोण आहे तें' असा तिनेंच प्रश्न विचारला होता. तिला आठवलें कीं 'मी यशवंत देशमुख' असें त्यानेंही उत्तर दिलें. 'यशवंत देशमुख' हे शब्द तिच्या कानांत घुमूं लागले व तत्क्षणींच 'यशवंत' असा शब्दोच्चार झाला. तिच्याच तोंडून निघालेला तो शब्दोच्चार ऐकून मात्र ती एकदम चपापली. समोर जिभल्या चार्टीत बसलेल्या जमादारानेंही तो शब्द ऐकला. 'बाई' जमादार ऐटींत बोलले, 'त्याच इसमाच्या हातून आम्हीं तुमची सुटका केली. आतां तुम्ही निर्धास्त असा' मिशांचे रँगलरी आंकडे कुरवाळीत जमादारानें दिलेलें हें अश्वासन ऐकून, तशाही स्थितींत विमलेला हंसू आल्यावांचून राहिलें नाहीं.

गाडी घराजवळ येतांच विमल धांवतच घरांत गेली व तिच्या मागोमाग कमरेचा पट्टा सांवरीत सांवरीत जमादारही आंत शिरले. नेहमींपेक्षां घरीं परत येण्यास विमलेला उशीर झाला होता म्हणून दादासाहेब स्वतःच तिच्या शोधार्थ घराबाहेर पडण्याच्या तयारींत होते. तोंच विमल आलेली पहातांच त्यांना आनंद झाला. पण हा आनंद मागून येणाऱ्या जमादाराला पाहतांच मात्र पार नाहींसा झाला. विमलेनें एका ईझिचेअरवर आंग टाकलें.

'साहेब' जमादार बोलले 'या आपल्या–

'माझी मुलगी ती. कां बरं?' दादासाहेबांनीं आश्चर्यानें विचारलें.

'यांच्यावर टेंकडीच्या बाजूला एका माथेफिरूनें हल्ला केला...'

जमादाराच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच दादासाहेब मटकन् जवळच्या खुर्चीवर बसले. त्यांनीं एकदां डोळे मिटून ईझिचेअरवर स्वस्थ पडलेल्या विमलकडे पाहिलें व नंतर पुन्हां जमादाराकडे पाहिलें. जमादारानें हळु हळु घडलेला सर्व प्रकार दादासाहेबांना सांगितला.

'काय त्या इसमाचें नांव म्हणालांत?'

' यशवंत देशमूख ' असें जमादाराच्या तोंडचें उत्तर ऐकून इतक्या वेळ डोळे मिटून पडलेल्या विमलेला खुदकन हंसू आलें. दादासाहेबांची नजर लागलीच तिकडे गेली, ' कां ग हंसतेस विमे ? ' असें त्यांनीं विचारलें, ' कांहीं नाहीं उगीच ' असें उत्तर देऊन विमल उठून घरांत स्वतःच्या खोलीकडे निघून गेली.

' जमादारसाहेब, तुमचे माझ्यावर फार उपकार आहेत ' दादासाहेब अंतःकरणपूर्वक म्हणाले.

' कसचं काय ! कसचं काय, आमचं हें कामच आहे.'

' त्या चोराला चांगला डांबून टाका '

' ती काळजी नको, कमींत कमी तीन वर्षं चुकत नाहींत '

दोन चार मिनिटांतच दादासाहेबांनीं पुढें केलेली दहाची नोट ' नको नको, मला कशाला ' असे उद्गार काढीत जमादारानें खिशांत कोंबली व सलाम करून स्वारी घराबाहेर पडली.

इकडे त्याच वेळीं गळ्याभोंवती वसंताचा स्कार्फ गुंडाळून सुंदर क्लबाकडे जेवण्यास निघालेली वाचकांना आठवत असेलच. क्लबांत सुंदर गेली तेव्हां बऱ्याच मुली पाटावर बसल्या होत्या, व कांहीं अजून येणार होत्या. ही आंत जातांच 'या सुंदरराव !' असा आंतल्या मुलींनीं एकच गिल्ला केला. मानेला एक दोन हिसके देऊन 'आलें आलें बरं ' असे उद्गार काढून सुंदर एका पाटावर जाऊन बसली.

' काय सुंदरराव, आज डिफीट ना ! ' काशी नांवाच्या एका मुलीनें पिंग-पाँगच्या सामन्यास उद्देशून सुंदरला खोंचक प्रश्न विचारला.

' हो हो, झाला बरं काशीबा, मग काय तुमचं म्हणणं ! '

क्लबांतल्या मुली परस्परांना पुरुषी नांवानें हांक मारीत असत. सुंदरला सुंदरराव, गंगू पवारला–गंगाराम इत्यादि नांवें रोजच्या व्यवहारांतील झालीं होतीं. पण काशीला मात्र आजपर्यंत पुरुषी नांव दिलें गेलें नव्हतें. कांहीं दिवस काशीला काशीनाथ या नांवानें हांक मारण्याचें ठरलें होतें पण तें नांव फारच चमत्कारिक वाटल्यावरून पुढें मुलींनीं आपण होऊनच काशीला काशी या साध्या नांवानेच हांक मारण्यास सुरवात केली

होती. पण आतां सहज बोलतां बोलतां व नाथ या शब्दाचा उपयोग न करतांही काशीला पुरुषी नांव सांपडलेलें ऐकून सर्व मुलींना आनंद झाला. एकीनें तर काशीच्या पाठीवर लडबडणारा शेपटा ओढून 'बोल माझ्या काशीबा, काय तुझं म्हणणं आहे ?' असे उद्गार काढून बिचाऱ्या काशीला चिडविण्यास सुरवात केली. पण तेवढ्यांत गंगाराम म्हणजे गंगू पवार आल्या मुळें काशीची फजिती फारशी झाली नाहीं. 'कायग गंगू तूं तरी करशील कां उद्यां विमलचा पराभव ?' एकीनें गंगूला प्रश्न केला. पण गंगू या प्रश्नाचें उत्तर न देतां सुंदरजवळ जाऊन बसली. तेवढ्यांत वाढणेंही संपलें. त्यामुळें जेवण्यास सुरवात झाली. सर्व मुली एका पंक्तींतच जेवावयास बसत. निदान तेथें तरी ब्राह्मण-ब्राह्मणेतर पंक्तिप्रपंच दिसला नाहीं. मध्येंच एखादा सार्वत्रिक विषय निघून सर्व मुली तिकडे लक्ष देत तर मध्येंच शेजारच्या मुली परस्परांशीं कुजबुज करूं लागत.

बोलतां बोलतां मध्येंच एक मुलगी शेजारचीला म्हणाली, 'सखे, खरं तुझ्या पत्राची ती हकिगत सांग कीं ग सगळ्याजणींना.' हें ऐकतांच किंचित्काल शांतता झाली व सर्व मुली अगदीं लक्ष लावून ऐकण्यासाठीं उत्सुक झाल्या. सखू फडकेला त्याच दिवशीं कॉलेजांतल्या एका आचरट विद्यार्थ्याचें प्रेम-पत्र आलें होतें.

'मला किनई' सखू उपहासानें म्हणाली, 'त्या स्कॉलर पाध्यांचं लव्ह-लेटर आलं आहे आज. अगदीं लग्नाचं प्रपोजल करताहेत.' एवढें म्हणून स्वतः सखूच खदखदां हंसू लागली. इतर मुलीहि पोट धरधरून हंसू लागल्या.

'मग काय आहे का बेत ?' एकीनें विचारलें.

'चांगले आहेत हो ते, तुझ्यासारख्या पठाणी मुलीला बरे शोभतील ते काटकुळे वीर' दुसरीनें उद्गार काढले.

पुन्हां थोडा वेळ हंशाचा गलबला झाला, नंतर स्वतः सखूच किंचित रागानें म्हणाली, 'त्या अजागळाला प्रेम म्हणजे काय मंडईत मिळणारी भाजी वाटली कीं काय ? कुणास ठाऊक ! म्हणे माझ्यावर प्रेम करा !' सखूनें फणकाऱ्यानें उच्चारलेले हे शब्द बऱ्याच जणींना पटले असावे असें त्यांच्या चर्येवरून कोणासही सहज दिसून आलें असतें. पाध्यांच्या पागल

प्रेमाची अशी रेवडी उडाल्यानंतर पुन्हां मुली आपआपसांत कुजबुजूं लागल्या. गंगू सुंदर शेजारींच बसली होती, साहजिकच त्यांचे बोलणें सुरू झालें.

‘ सुंदर ! मघाचा सर्व प्रकार विसरलीस ना ? ’

‘ होय ! गंगू आतां कितीदां सांगूं पुन्हां तुला ! ’

‘ हें बघ, पुन्हां तूं रागावलीस माझ्यावर ! ’

‘ काय वेडी आहेस ग? ’

‘ मग अगदीं आपण आतां सिस्टर्स अं ! ’

‘ कबूल ! ’

‘ अगदीं तूं न् विमल तशीच तूं न् मी ’

‘ हो, हो, हो ’ असें किंचित त्रासिक उत्तर देऊन तहान लागली नसतांही सुंदरनें पाणी पिण्यास सुरवात केली. गंगूबद्दलचा सर्व राग नाहींसा होऊन सुंदरला आतां तिच्याबद्दल थोडी कींव वाटूं लागली होती. सुंदरचें उत्तर ऐकून गंगूनें मात्र नाटकी समाधानाचें स्मित केलें. पण तेवढ्यांत जरा बाजूस तोंड वळवून वरच्या दातांनी खालचा ओठ दाबल्यावांचून तिला राहवलें नाहीं.

जेवण व त्याबरोबरच थट्टामस्करी संपल्यानंतर सर्व मुली आपआपल्या खोल्यांकडे गेल्या. सुंदर व गंगूही आपआपल्या खोल्यांत गेल्या, खोलींत जातांच सुंदरनें गळ्याभोंवतालचा स्कार्फ काढून त्याची नीट घडी करून तो बिछान्यावरील उशीखालीं ठेऊन दिला. नंतर ती खुर्चीवर जाऊन, दिव्याकडे पहात बसली. एकदम तिला तिच्या जिवलग मैत्रिणीची आठवण झाली. विमल आपल्याला हांका मारण्यास आली असतांही आपण दार उघडलें नाहीं, फिरावयास जातांनासुद्धां ती आज एकटीच आपल्याकडे न येतां गेली ह्या गोष्टी ध्यानांत येतांच आत्तांच्या आत्तां आपण विमलकडे जाऊन तिला भेटून यावें असें तिला वाटूं लागलें. या पूर्वींही ती दोन वेळां रेक्टरच्या परवानगीनें रात्रीं साडेदहा अकरा पर्यंतही विमलकडे गप्पा मारीत बसली होती. विचार मनांत येतांच सुंदर ताडकन् उठली व रेक्टरची परवानगी घेऊन विमलेच्या घराकडे निघाली. रेक्टरनें परवानगी देतांना ‘ दहा साडेदहाच्या आंत परत या अं ! ’ असें तिला बजावलेंच.

गंगू पवार खोलींत जाऊन इकडे तिकडे हिंडूं लागली. जरी बाह्यांगीं सुंदरशीं मैत्री दाखविण्याचें तिनें ठरविलें होतें तरी कां न कळे ती अंत-

यांमीं सुंदरचा भयंकर द्वेष करूं लागली होती. सुंदरला कोणत्या ना कोण-त्या तरी जाळ्यांत अडकवून तिला फशीं पाडावें, एरवीं तिचा पावित्र्याचा व प्रेमाचा नशा उतरणार नाहीं अशा आसुरी बुद्धीनें ती युक्तीचा विचार करूं लागली. बऱ्याच वेळानें 'हां त्यांनाच हें कळवावें.' असें कांहींसें पुटपुटून दिवा किंचित बारीक करून, दार नुसतें लोटून घेऊन रेक्टरच्या परवानगीशिवाय बाहेर जाण्यांत ती किंचितही गडबडलेली दिसली नाहीं. दिवा जळत ठेऊन, आपण खोलींतच आहोंत असें रेक्टरांस भासवून, बाहेर जाण्याची तिला चांगलीच संवय होती.

सुंदर विमलच्या घरीं गेली त्यावेळीं विमल जेवण आटोपून नुकतीच आपल्या खोलींत जाऊन ईझिचेअरवर बसली होती.

'विमल!' विमलेच्या खोलींत पाय टाकतांच सुंदर जरा कुऱ्यांनेंच म्हणाली 'आज फिरायला जातांना आली नाहींस माझ्याकडे?' बिचा-रीला विमलेवर केवढा घोर प्रसंग ओढवला होता याची यत्किंचितही कल्पना नव्हती. विमलेनें हळूहळू सर्व हकिगत सुंदरला सांगितली. ती ऐकतांच 'विमे! मी तुझ्याबरोबर आज नव्हतें म्हणून हा प्रसंग तुझ्यावर ओढवला मींच आज तुझ्यावर रागावलें नसतें तर—' असे उद्गार काढून सुंदर रडूं लागली. 'सुंदर काय हें! होणार तें झालं. तूं असतीस तरी काय केलं असतंस बरं' असें बोलून सुंदरच्या प्रेमळ अंतःकरणाचें सांत्वन करण्याचा विमलनें प्रयत्न केला. लागलीच अश्रू पार मावळले व सुंदर आवेशानें म्हणाली, 'मी काय केलं असतं म्हणतेस? मी तुझ्यासारखी बेशुद्ध पडलें नसतें. मारे आरडाओरड करून त्या मांगांच्या हाताला कडकडून चावलें असतें. पायांतल्या वाहणानीं त्यांची यथेच्छ पूजा केली असती. निदान अंबाड्यांतला आंकडा तरी एकाद्याच्या डोळ्यांत खुपसला असता.'

'बाईसाहेब प्रसंग आला म्हणजे हें सारं शौर्य गडप होतं बरं का! पण सुंदर, या संकटांतून ज्यांनीं माझा बचाव केला ते यशवंतराव देशमुख आपल्याच कॉलेजांत—'

'कोण! यशवंतराव देशमूख! ते आले का तुझ्या मदतीला! अग ते तर वसंतरावांचे मित्र आहेत व यंदांच बी. ए. ला पहिले येणार आहेत!'

सुंदर हें सहज बोलून गेली. तिला यशवंताबद्दल, वसंताच्या बोलण्यांत आजपर्यंत बरीच माहिती मिळाली होती. सुंदरनें यशवंताबद्दलचे काढलेले उद्गार ऐकून विमलनें समाधानानें सहज डोळे मिटून घेतले. चाणाक्ष सुंदरनें तें ओळखलें. ती हळूच हंसली. नंतर थोडा वेळ गप्पा मारून सुंदर परत वसति-गृहाकडे निघून गेली व झोपण्यासाठीं विमलही बिछान्यावर पडली !

---

## प्रकरण ११ वें.

# " ही कोण ? "

यशवंताला पोलीस चौकीकडे नेल्यावर मोहन आपल्या उडाणटप्पू मित्रांबरोबर सर्जाच्या माडीवर गेला. ब्राह्मणाच्या मुलीला पळवून आण-ण्याचा त्यांचा बेत जरी साध्य झाला नव्हता तरी अगदीं अचानक रीतीनें यशवंताला आपण जाळ्यांत अडकविलें याबद्दल त्या तिघांना व विशेषतः मोहनाला आनंदाच्या उकळ्या फुटत होत्या. मोठमोठे बेत करून व त्यासाठीं जिवापाड श्रम करूनसुद्धां यशवन्ताला अशारीतीनें गोत्यांत आणणें फार कठीण होतें पण तेंच केवळ सहज साध्य झालें होतें ! मग मोहनाला, यश-वन्ताच्या कट्टया शत्रूला आनंद कां होणार नाहीं ? सज्जनांच्या शिरावर संकट परंपरा ओढून येऊं लागली असतां दुर्जनाखेरीज दुसऱ्या कोणास आनंद होणार ?

सर्जाच्या माडींत मंडळींत जाऊन पोहोंचतांच, त्यांची चर्पटपंजरी सुरू झाली.

' सर्जा ! ' मोहन उद्गारला.

' बोल '

' कशी शिकार साधली आज ? '

' तेवढी पोरगी मात्र विनाकारण हातची सुटली ! '

' जाऊं दे रे ! आपल्याला काय कमी आहे ? नान्या उद्गारला.

'पण यशवंत्याची चांगली खोड मोडेल आतां' मोहनानें आसुरी समाधानानें विकट हास्य केलें!

'मोहन! पोरगी पण अशी होती म्हणतोस—'

'अरे ती तर त्या भटुरग्या देशपांड्यांची छोकरी!'

'कोण? दादासाहेब देशपांडे? ब्राह्मणांचे पुढारी?'

'होय बाबा तेच' मोहनानें उत्तर दिलें.

बराच वेळ तिघेजण निरनिराळे विचार करीत स्वस्थ बसले. थोड्याच वेळांत भिंतीवरच्या घड्याळांत साडे नवाचा एक ठोका पडला. तो ऐकतांच सर्जा एकदम चमकला. अलीकडे पाच सहा महिन्यांत तो रात्रीं नवांच्या पुढें आपल्या घरीं कोणालाही, अगदीं मोहन नान्या यासारख्या जिगरजान मित्रांनाही, येऊं देत नसे. एकदां तर स्वतः मोहन रात्रीं अकराच्या सुमारास आला असतांही सर्जानें घराचें दार उघडलें नाहीं. साडे नऊ झालेले पाहतांच सर्जा एकदम उठून उभा राहिला व पुन्हां एकदां घड्याळाकडे पाहून, एक जांभई देऊन म्हणाला 'मोहन, नान्या! आज बराच उशीर झाला रे!'

'होऊंदेरे, बसूं जरा आणखीं थोडा वेळ' मोहन म्हणाला.

'छेः छेः! माझ्याकडे कांहींजण येणार आहेत.'

'मग येऊंदेत, आम्ही काय खातों कीं काय त्यांना.' नान्याजी बोलते झाले.

'कायरे सर्जा' मोहन म्हणाला 'रात्रीं नऊ वाजले कीं तूं आम्हांला बाहेर काढण्याची कां रे अलीकडे खटपट करीत असतोस. आज आम्हीं नाहींच हलणार!'

मोहनाचे हे निश्चयी उद्गार ऐकून सर्जाचा चेहेरा किंचित काळवंडला. पण यापुढें आपल्या मित्रांना तेथेंच बसूं देणें सर्जाला इष्ट नव्हतें. 'मोहन! तो जरा त्रासिकपणें उद्गारला. 'मला अगोदर बाहेर जावयाचें आहे. आतां रात्रही बरीच झाली आहे. आतां जा तुम्हीं घरीं. उद्यांची सकाळ तर नाही ना कुठें गेली.' सर्जाचे हे शब्द ऐकून व त्याची ती त्रासिक मुद्रा पाहून मोहन व नान्याजींना उठणेंच भाग आलें.

‘ बरं बुवा जातों आम्ही. ’

‘ मोहन ! पण सकाळीं जरूर ये अं ’ सर्जा ते जात आहेत हें पाहून आनंदून म्हणाला. मोहन व नान्या, सर्जाच्या घरून बाहेर पडले. वाटेंत चालतां चालतां त्यांचे थोडेसे संभाषण झालेंच.

‘ नान्या !’

‘ काय ?’

‘ हा सर्जा, अलीकडे रात्रीचा आपल्याला पहिल्यासारखा त्याच्या घरीं कांरे बसूं देत नाहीं ?’

‘ मला वाटतं तो कुठल्या तरी बड्या भानगडींत आहे ’ नान्याजी नाकाच्या उजव्या बाजूवर आंगठ्याजवळचें बोट नाचवून म्हणाले.

‘ असं काय ! एक दिवस लावलाच पाहिजे याचा छडा ’ असें पुटपुटून मोहन निमूटपणें चालूं लागला. घराजवळ येतांच, नान्याकडे वळून ‘ गुड नाइट ’ असे शब्द उच्चारून स्वारी आंत शिरली. मोहनाचे वडील, राव-साहेब देशमुख समोरच ओसरीवर झोपाळ्यावर बसले होते,

‘ कायरे, कुठं जातोस नेहमीं इतका वेळ ?’ रावसाहेबांनीं चिरंजीवास प्रश्न केला. आपल्या तोंडाचा सुवास म्हाताऱ्याच्या नाकापर्यंत पोहोंचणार नाहीं एवढ्या अंतरावरूनच, जरा तिरसटपणें ‘ गेलों होतों फिरायला ’ असें उत्तर दिलें.

‘ आणि यशवंत ?’

‘ मला काय माहिती तो कुठं जातो तें !’

‘ तो ही नाहीं अद्याप आला घरीं ’

‘ आज तो मोठ्या कामांत गुंतला आहे. ’

‘ कसल्या कामांत ?’ रावसाहेबांनीं आश्चर्योद्गार काढले.

‘ पोरी पळविण्याच्या ’ मोहनानें बेधडक गोळी सोडून दिली. आणि ही गोळी रावसाहेबांच्या मर्मस्थांनीं जाऊन भिडली.

‘ मूर्खा, काय सांगतोस ? ते संतापानें आरडले.

‘ कांहीं नाहीं. तुमच्या यशवन्ताला, एका मुलीला धरण्याच्या आरोपा-वरून पोलिसानें पकडलें आहे. असें म्हणून स्तंभित झालेल्या आपल्या

पित्याकडे हंसत हंसत पाहात मोहनाची स्वारी वर आपल्या खोलीकडे निघून गेली. यशवन्ताला पोरी पळविण्याच्या आरोपावरून पोलीसनें पकडलें आहे ही बातमी ऐकतांच म्हातारा आश्चर्यानें दडपूनच गेला. यशवंतावर त्यांचें पोटच्या पोराप्रमाणें प्रेम होतें. त्यांना अत्यंत दुःसह असें दुःख झालें. त्यांच्या हृदयांत कालवाकालव सुरू झाली. त्यांची छाती धडधडूं लागली. यशवन्ताच्या हातून असें कांहीं होईलसें त्यांना वाटेना. त्यांची सदसद्विवेक बुद्धि त्यांना स्पष्टपणें सांगत होती कीं यशवन्ताचें हातून असलें पापाचरण घडणें शक्यच नाहीं. मोहनाच्या तोंडचे ते उद्गार ऐकून एकदम धांवत जाऊन यशवंताला पोलिसांच्या कचाट्यांतून ओढून आणावेंसें त्यांना वाटलें. पण दुसऱ्याच क्षणीं हा विचार किती फोलकट आहे याची त्यांची त्यांनाच कल्पना आली. बिचाऱ्याला करूं तरी काय असें होऊन गेलें. म्हातारा कावरावावरा होऊन गेला, त्यांना कांहीं सुचेना, रात्रभर अंथरुणावर त्यांची सारखी तळमळ चालली होती, जरा बाहेरचें दार वाजलें कीं यशवंतच घरीं आलासें वाटून ते दाराकडे आशेनें डोळे लावून पहात. रात्रीं बाराच्या सुमारास तर दुःखातिशयानें व स्वतःस यशवंतास आत्तांचे आतां सोडवून आणणें अशक्य आहे ही सारखी टोंचणी लागल्यानें रावसाहेबांच्या करुण डोळ्यांतून अश्रूही झिरपल्यावांचून राहिले नाहींत. पहांटे तिहींच्या सुमारास मोहनानें आपणास भलतेंच कांहींतरी खोटें तर सांगितलें नसेल ना अशी एक शंका त्यांच्या मनांत आली. लगेच लटपटणाऱ्या पायानें उठून म्हातारा टेलिफोनजवळ गेला व यशवंतास पोलीसानें खरोखरच पकडलें आहे किंवा काय या बद्दलची त्यानें चौकीवर चौकशी केली. यशवंत बंदिवान म्हणून चौकींत बसला असतां पहांटे तिहींच्या सुमारास वाजलेली टेलिफोनची घंटा म्हणून मागें म्हटली ती हीच होय! यशवंतास खरोखरच पकडलें आहे ही बातमी फोनवरून कानांत शिरतांच म्हातारा 'अशक्य, अगदीं अशक्य' असें पुटपुटत कसाबसा बिछान्याजवळ जाऊन धाडकन् अंथरूणावर पडला.

रावसाहेबांचें आपल्यावर फारच कमी प्रेम आहे किंबहुना आपल्यापेक्षां यशवंतच त्यांना अधिक प्रिय आहे हें मोहन पूर्णपणें जाणून होता, म्हणूनच त्यानें मुद्दाम वर्मीं लागेल अशी बातमी जाणूनबुजून त्यांच्या कानीं घातली होती.

खोलींत जातांच आपल्या परमप्रियेला (सिगारेटला) हळूच बाहेर काढून तिला शिलगावून मोहनानें तिचें चुंबन घेतलें व तो धुराचे लोट सोडूं लागला, पश्चाखालीं उतरविलेल्या मद्याचा आतां त्याचेवर चांगलाच अंमल बसूं लागला होता. सिगारेटचें उरलेलें थोटूक खिडकीवाटे बाहेर फेंकून स्वारी अंथरुणावर पडली व तेथेंच त्याला गुंगी लागली. मोहनाला स्वप्नांत सुद्धां, यशवन्त व त्याचा आपण नायनाट करीत आहोंत अशी चित्रें दिसत. बरोबर आहे ! पाप्याला जागृतावस्थेंत काय किंवा स्वप्नांत काय पापाखेरीज दुसरें काय दिसणार आहे ? ज्याला त्याला मनांत नेहमीं वावरणाऱ्या गोष्टीच स्वप्नांत दिसावयाच्या ! दरोडेखोराला स्वप्नांत खून, मारामाऱ्या, पोलीस व तुरुंगच दिसणार ! उत्कट धर्माभिमान्याला स्वप्नांत परमेश्वर व स्वधर्माच्या सोज्वलतेचींच चित्रें दिसणार ! स्वदेशसेवकाला नेहमीं स्वातंत्र्याचींच गोड स्वप्नें पडणार ! स्वतःस सत्यशोधक ही पवित्र पदवी बळेंच लावून पाहणाऱ्या पापी व नादान ब्रह्मद्वेष्ट्याला, ब्राह्मणांच्या पोरी पळविण्याच्या कल्पनांचींच भुतें स्वप्नसृष्टींत दिसणार ! ! खऱ्या सत्यशोधकाला देशसेवेसाठीं, किंवा स्त्रियांच्या रक्षणासाठीं प्राणार्पण करण्यास सिद्ध होणाऱ्यांच्याच कर्तृत्ववान् मूर्ती स्वप्नांत दिसणार !

मोहनाला त्या रात्रीं असेंच एक स्वप्न पडलें. जणूं काय रावसाहेब मरून हा स्वतःच मालक झाला आहे. जणूं काय मनाला येईल त्या स्त्रीशीं स्वैराचार करण्यांत हा दंग झाला आहे. मद्याच्या बाटल्यांबरोबरच वारांगनांच्या लीलांचीही खैरात चालली आहे. इतक्यांत दीनवाण्या मुद्रेनें, चिंध्या पांघरलेला दरिद्री यशवंत अन्नास मोताद होऊन, घांसभर अन्नाच्या आशेनें याच्या दाराशीं उभा राहिला आहे. यशवन्ताला अशा दुर्धट स्थितींत असलेला पाहून मोहनाला स्वप्नांत कां होईना पण स्वर्गप्राप्तीचा आनंद झाला. तो उठला, व धांवत जाऊन त्यानें दारीं असलेल्या यशवंताला लाथ मारून हांकून दिलें. सूडाचें समाधान झाल्यानें तो एकदम मोठ्यानें हंसला. इतक्यांत एका अज्ञात व्यक्तीनें त्याचा गळा धरला. गळ्यावरची पकड घट्ट घट्ट होत जाऊन, प्राणांतिक वेदना होऊन, याची जीभ बाहेर पडूं लागली. थिजत जाणाऱ्या मलूल डोळ्यांनीं त्या अज्ञात

व्यक्तीकडे पाहण्याचा मोहनानें फार प्रयत्न केला, पण तो साध्य झाला नाहीं.

स्वप्न सृष्टींतील असलें भयानक दृश्य पाहून मोहन जागा झाला. इतका वेळ आपण जें कांहीं पाहिलें तें सर्व खरें नसून स्वप्न होतें हें ध्यानांत आल्यावर त्याचा जीव खालीं पडला व तो पुन्हां झोपी गेला.

मोहन व नान्याजी यांना साडे नवाच्या ठोक्याबरोबर घराबाहेर काढून सर्जानें घराचें दार बंद करून घेतलें व खोलींत येऊन इकडे तिकडे येरझारा करूं लागला. मधून मधून घड्याळाकडे पाहून, एक निःश्वास सोडून, खिडकींतून रस्त्यावर दूरवर डोकावून पाही. तो कोणाची तरी उत्सुकतेनें वाट पहात असून ती व्यक्ती आपल्या मित्रांच्या नजरेस पडूं नये अशी त्याची फार इच्छा असल्यामुळें नाइलाज म्हणून त्यानें आपल्या जिगरजान मित्रांना बळेंच बाहेर काढलें होतें. इतक्यांत जिन्यावर कोणाचीं तरी पावलें व रडण्याचा आर्त स्वर याच्या कानीं पडला. सर्जानें तिकडे पाहिलें तो त्याच्या नजरेस डोळ्याला पदर लावून स्फुंदून स्फुंदून रडणारी एक व्यक्ती पडली.

'म्हातारे !' सर्जा संतापानें खेकसला.

'अरे बाबा, आतां माझ्यानें नाहीं रहावत रे !'

फत्तरालाहि पाझर फुटेल अशा करुण शब्दानें त्या माऊलीनें मुलाजवळ याचना केली. काय असेल तें असो, सर्जानेंही खिशांतून एक पावली बाहेर काढून म्हातारीच्या अंगावर फेकली. तेवढ्यांत तिला 'हं जा मर ! काय आणायचं असेल ते मागच्या दारानें आण. पुढच्या दारानें बाहेर जाशील तर खबरदार. अन् पुन्हां मला सतवायला अशी रात्रीची येत जाऊं नकोस.' असें बजावून सांगण्यास तो चुकला नाहीं. म्हातारी खालीं निघून गेली. सर्जानें खिडकीतून बाहेर वांकून पाहिलें. या खेपेस मात्र त्याला हवें तें माणूस त्याच्या नजरेस पडलें, त्याच्या चेहऱ्यावर समाधानाचा दिलखुषी रंग पसरला. खालीं धांवत जाऊन त्यानें दार उघडलें, रस्त्यांत कंदिलाचा उजेड होताच. दार उघडतांच एक काटकिळी उंच व्यक्ती आंत आली. 'सर्जेराव दार लावा अं नीट' असें उद्गार त्या व्यक्तीनें काढलें. दार लावून दोघेंही पुन्हां माडीवर आलीं.

' सर्जेराव ' ती व्यक्ती उच्चरली.

' काय ? '

' ती रस्त्याच्या बाजूची तेवढी खिडकी लावून घ्या बरं आधीं '

सर्जानें हुकमाची अंमलबजावणी केली.

' सर्जेराव, मी अशी रात्रीची नेहमीं इकडे येतें हें कुणास कळणार तर नाहीं ना ? '

' छेः छेः ! वेडी कुठली '

स्त्रियश्चरित्रं पुरुषस्य भाग्यं, देवो न जानाति कुतो मनुष्यः ! सत्य, अगदीं सत्य ! स्त्रीच्या चारित्र्याची प्रत्यक्ष सर्वसाक्षी भगवानालाही नीटशी कल्पना येणार नाहीं तर मानवांचा काय पाड ? सर्जासारख्या स्वतःस सत्यशोधक समजणाऱ्या अमंगल पतिताच्या रंगमहालांत आलेली ती व्यक्ती एक तरुण स्त्री होती. वाचकांना आश्चर्य वाटेल, कित्येकजण प्रस्तुत लेखकाला वेड्याच्या इस्पितळांत पाठवण्यास तयार होतील, पण खरें सत्य असें होते कीं, ती व्यक्ती एक तरुणीच होती एवढेंच नव्हे तर एक सुशिक्षित कुमारिका होती. विषयी वासनेला बळी पडून, स्वतःचें पवित्र कौमार्यही दुखावून घेण्यास तयार होणारी ती दुर्दैवी, पतित, नादान, सुशिक्षित तरुणी होती ! ती दुसरी तिसरी कोणी नसून वाचकांना परिचित असलेली—! !

---

## प्रकरण १२ वें

# " अजब दुनिया ! ! "

दुसऱ्या दिवशीं सकाळीं सर्व विलासपुरांत आदले रात्रीं घडलेल्या प्रसंगाची बातमी वणव्यासारखी पसरली. खास्या वर्तमानपत्रांतून ' ब्राह्मण कुमारिकेवर अत्याचार ' ' कॉलेजच्या मुलीवर भयंकर प्रसंग ' अशा प्रकारच्या जाड जाड ओळी फडकूं लागल्या. वर्तमानपत्रें विकत घेण्यासाठीं

पदरची दिडकीही खर्च न करणाऱ्या फुकट्या वाचकांनीही आज वर्तमानपत्र विकत घेण्याचा मोठा उदारपणा दाखविला. जिकडे तिकडे एकाच विषयावर चर्चा होत होती. विलासपुरांत प्रमुख समजलें जाणाऱ्या एका वर्तमानपत्रांत पुढीलप्रमाणें मजकूर होता.

## भयंकर अत्याचार !

काल सायंकाळीं येथील टेंकडीच्या बाजूस, येथील सुप्रसिद्ध नागरिक रा. रा. दादासाहेब देशपांडे यांची कॉलेजांत शिकणारी विमल या नांवाची एक मुलगी, फिरणें झाल्यानंतर घरीं परत येत असतां वाटेंत कोणी अधमानें तिच्यावर बलात्कार करण्याचा प्रयत्न केला, पण सुदैवानें कु. विमल त्या संकटांतून सुखरूप पार पडली. संशयावरून एका तरुणास पोलीसनें पकडलें आहे. सदरहू अत्याचार येथील कांहीं ब्रह्मद्वेषी गुंडांकडूनच झाला आहे, अशी आम्हांस जबर शंका आहे. ब्राह्मण समाज अद्याप तरी जागा होईल काय ?—"

विलासपुरांतच ब्राह्मणेतर पक्षाचें असें दुसरें एक वर्तमानपत्र होतें. त्यांनींही सदरहू प्रकारचा कडक शब्दांत निषेध केला होता. एका टारगट गटार–पत्रानें मात्र 'भटाच्या पोरीला धरलें' अशात-हेचें शीर्षक देऊन समाजाची टिंगल करण्याचा प्रयत्न केला होता. या खेरीज मंडळींतून नाना तऱ्हेची टीका सुरू होत्या.

एके ठिकाणीं आवर्तनासाठीं म्हणून कांहीं भिक्षुक जमले होते. तेथेंही याच विषयाची चर्चा होत होती.

'कायरे, शामभट, देशपांड्यांच्या पोरीवर काल कोणी हात टाकला म्हणतात !' रामभटानें विचारलें.

होय बुवा, आतां येतां येतां ऐकलं खरं.' शामभटानें तपकिरीची चिमूट ओढतां ओढतां उत्तर दिलें.

'कोणी हात टाकला तें कळलं का !'

'अरे कोणी तरी सत्यशोधक असायचा.'

शामभटाच्या मतानें सत्यशोधक म्हटला म्हणजे तो ब्राह्मणेत्तर व ब्रह्मद्वेषी असावयाचाच. किंबहुना विलासपुरांत बऱ्याच लोकांची तशीच सम-

जुत आलेली होती व त्याला कारणेंहि चांगलीं सबळ होतीं. अगदीं मुख्य कारण म्हणजे शहरांतील कांहीं पुंड लोक स्वतःस सत्यशोधक म्हणवून घेऊन ब्राह्मणांची वाटेल तशी छी थु करण्यास टपून बसलेले होते. कांहीं शंख तर ब्राह्मण–मुलीवर खुशाल हात टाका. असाही आपल्या सहचरांस उपदेश करीत. कांहीं मात्रागमनी पिशाच्चें तर ' भररस्त्यांत भटांच्या पोरींची विटंबना करा. ' असा आपल्या दोस्तांना खाजगी रीतीनें सल्ला देत. अशा परिस्थितींत ' सत्यशोधक ' व ' ब्राह्मणेतर ' या शब्दांचा अर्थ ' ब्रह्मद्वेषी ' किंवा ' ब्राह्मण हेटर ' असा रूढ होऊन जावा यांत फारसें आश्चर्य नव्हतें.

विलासपुरांतच जे थोर घराण्यांतील असे ब्राह्मणेतर होते त्यांना हा अत्याचाराचा प्रसंग ऐकून मनस्वी चीड आली. हे महाभाग ब्राह्मणेतर होते पण ब्राह्मण-हेटर नव्हते. हे सज्जन सत्यशोधक होते पण ब्रह्मद्वेषी नव्हते. त्यांतील एक शिंदे या आडनांवाचे गृहस्थ तर दादासाहेब देशपांड्यांचें मित्र होते. आपल्या ब्राह्मण मित्राच्या मुलीवर ओढवलेल्या प्रसंगाची हकिगत ऐकून त्यांना जणूं काय त्यांच्या स्वतःच्याच मुलीवर कोणीतरी अत्याचार करण्याचा प्रयत्न केलासें वाटलें. धांवतच ते दादासाहेबांकडे गेले.

शहरांतील सुशिक्षित ब्राह्मण–समाज तर अगदीं खवळून गेला. कांहीं ताज्या रक्ताचे तरुण तर संतापानें भडकून जाऊन अपराध्याच्या नरडीचा घोंट घेण्याची बेफाम हांव धरूं लागले.

बऱ्याच पत्रांतून अपराधी म्हणून पोलिसानें यशवंत देशमुख या नांवाच्या एका ब्राह्मणेतर तरुणास पकडलें आहे असा उल्लेख होता. गांवांत तर यशवंत देशमुख हे नांव सर्वतोमुखीं झालें होतें. सर्वजण आपआपल्या परीनें त्या हतभाग्याचा उद्धार करीत होते. नदीवर धुणी धुण्यास जमलेल्या नायकांतसुद्धां हाच विषय प्रामुख्यानें दिसून येत होता.

' काय हो रंगूबाई, काळचा प्रकार ऐकलात का तुम्ही ' चिंगूबाईनें धुणी आपटतां आपटतां मध्येंच थांबून विचारलें.

' म्हणजे तोच ना ? ' रंगूबाईनीं धुणें थांबवून, एक हात कमरेवर ठेवून सूचक प्रश्न विचारला.

' तोच ना म्हणजे कोणचा ? '

‘ तो देशपांड्यांच्या मुलीचा ’

‘ हं ! ’

‘ काय तरी बाई आश्चर्य ! मेले आतां मुलीबाळींच्याही अंगावर हात टाकूं लागले. ’

‘ निसंतान होईल मेल्यांचं ’ पुन्हां धुणीं आपटण्याचा सपाटा सुरू झाला.

विलासपुरांत जें कांहीं नादान संभावित स्वतःस सत्यशोधक समजत त्यांत निराळीच चर्चा चालू होती.

‘ काय रंगेलराव ! ’

‘ रामराम, रामराम, बाबूराव ! ’

‘ ऐकलंत कीं नाहीं ? ’

‘ काय ? ’

‘ अहो तो प्रकार ’

‘ हं, हं, तो, ना ! ऐकला तर. भली खोड मोडली बामणाची. अन् काय पण मोठ्या नखऱ्यानं जातात शाळेंत ’ ब्राह्मण महिलांवर टीका करण्याच्या भरांत ब्राह्मणेतर मुलीही शाळेंत जातात हें रंगेलराव विसरूनच गेले.

‘ छेः ! पण यावा तसा मजा झाला नाहीं. ’

‘ कां ? ’

‘ अहो पोरगी ऐन वेळीं त्या बिचाऱ्याच्या हातून उडाली. ’

‘ होय, बाबूराव, तेवढं जमलं असतं म्हणजे या बामणांचं नाक कापून त्यांत अगदीं मिरची गेली असती. ’

त्याच दिवशीं सायंकाळीं नदी-किनाऱ्यावर, विलासपुरांतील सर्व धर्मियांची एक जंगी जाहीर सभा भरून सदरहू अत्याचारांचा तीव्र निषेध करण्यांत आला. सदरहू सभेस बराच मोठा समाज व विशेषतः ब्राह्मणवर्ग प्रामुख्यानें हजर होता. तेथें बऱ्याच समाज सेवकांचीं कळकळीचीं भाषणें झालीं. त्यांतल्या त्यांत जाधवराव या नांवाच्या एका खऱ्या सत्यशोकाचें फारच परिणामकारक भाषण झालें. ‘ मी स्वतः ’ ते म्हणाले ‘ जरी मराठा व अतएव ब्राणणेतर असलों तरी सदरहू प्रकार ऐकतांच माझ्या तळव्याची आग मस्तकाला जाऊन पोंचली. ब्राह्मण स्त्रीवर झालेला हा अत्याचार

म्हणजे सर्व स्त्री--जातीचाच हा घोर उपमर्द आहे असें मी समजतों. मी स्वतः सत्यशोधक आहे व कित्येक बाबींत माझा व माझ्या ब्राह्मण बंधूंचा मतभेद आहे. त्याचा अर्थ असा नव्हे कीं, मी ब्राह्मण समाजाला तुच्छ लेखतों. ब्राह्मण हे माझे बंधूच होत. व त्यांच्यावर येणारी आपत्ती ही माझ्यावर आलेली आपत्ती होय अशी माझी ठाम समजूत आहे. खरोखर ब्रह्मद्वेषानेंच जर हा अत्याचार केला गेला असेल तर तो इसम मनुष्य नसून नर्कांतला किडाच असला पाहिजे. खऱ्या सत्यशोधकाला, जातिवंत मराठ्याला, असले नीच प्रकार ऐकून केव्हांही दुःखच होईल !' जाधवराव या पुढें कितीतरी वेळ बोलत होते.

सुंदरचा बालमित्र, व यशवंताचा जिवलग स्नेही मुंबईस असतांनाच त्याला ही बातमी कळली. संशयावरून यशवंताला पकडल्याचें वृत्त वाचून तो स्तंभितच झाला. यशवंत पूर्ण निरपराधी आहे असें रावसाहेबांप्रमाणेंच त्याचीही मनोदेवता त्याला स्पष्ट सांगूं लागली. तो जरूरीच्या कामाकरितां म्हणून मुंबईस गेला होता, व अद्याप तें कामही पुरें झालें नव्हतें. पण ही कोसळलेल्या भीषण संकटाची बातमी ऐकून त्याला रहावेना. खरोखरच पंख असते तर त्याच क्षणीं उडून तो विलासपुरांत आला असता. अर्धवट झालेलें अपुरें काम तसेंच सोडून विलासपुराकडे येण्यासाठीं तो तांतडीनें निघाला.

खऱ्या मित्रप्रेमांत अशीच सात्विक तळमळ असते. खरा मित्र संकट प्रसंगीं असाच धांवून जात असतो.

ज्या मुलीवर अत्याचार झाला त्या मुलीचें नांव विमल देशपांडे आहे असें वाचून ती सुंदरची मैत्रिण आहे हें वसंताच्या तेव्हांच ध्यानांत आलें. खऱ्या प्रकाराची सर्व माहिती सुंदरकडून आपणांस मिळेल अशी त्याची खात्री होती. विलासपुरांत आल्याबर प्रथम तो सुंदरच्या खोलीकडे गेला. वसंत हा असा अचानक परत येईल अशी सुंदरला मुळींच कल्पना नव्हती. ती आपल्या खोलींत, एका खुर्चीवर समोरच्या वाटोळ्या टेबलावरील मोठ्या आरशांत स्वतःचेंच रम्य प्रतिबिंब पहाण्यांत दंग झाली होती. तिनें आपल्या प्रियकराच्या खांद्यावर व हृदयावर नेहमीं विलगणारा स्कार्फ आतां स्वतः च्याच गळ्याभोंवतीं गुंडाळला होता.

आणि आरशांतल्या तरुणीचें लावण्य पाहून सुंदरला खरोखरच साभिमान कौतुक वाटत होतें. सुंदर सुंदर नव्हती हें खरें. पण तिच्या वदनावर तारुण्याच्या तजेल्याचा कासमोलाचा फुलबाग बहरला होता हेंहीं कांहीं खोटें नाहीं. आरशांतल्या तरुणीच्या गालावर चार दोन उडाणटप्पू चुकार केस मोठ्या लडिवाळपणानें दंगल करीत होते. तिच्या डोळ्यांत तारुण्याच्या गुलाबी मोहिनीचें रम्य पाणी खेळत होतें. सुंदरचे हात गळ्यांतील स्कार्फवर व डोळे आरशांतल्या तरुणीच्या डोळ्यावर खिळून राहिले होते. तिच्या पातळाचा पदर डाव्या खांद्यावरून मागें जाऊन तसाच खुर्चीच्या पाठीवर लोंबत राहिला होता. स्वतःच्या प्रतिबिंबाकडे पाहतां पाहतां ती कल्पनासाम्राज्यांत दंग झाली. वाटलें कीं जणू काय तिचे वसंतरावच तिच्या मागें येऊन उभे राहिलेले आहेत. वाटलें कीं जणू काय ते हिच्या गोड प्रतिबिम्बाकडे पाहून लबाडपणें हंसत आहेत. तों काय आश्चर्य ! खरोखरच 'सुंदर' अशी वसंतानें हांक मारल्याचा तिला भास झाला. तिनें एकदम मागें वळून पाहिलें. तिच्या डोळ्यांस त्यावेळीं कोणतें चित्र दिसलें ? खुर्चीच्या पाठीशीं उभ्या असलेल्या तिच्या प्रियकराचीच, वसंताची खरी मूर्ती तिच्या नजरेस पडली. सुंदर लाजली. क्षणभर तिचे डोळे लागले. तिच्या रम्य कपोलावर सूर्योदयाच्या पूर्वीचा गुलाबी साज रंगून गेला. वसंताला तिच्याकडे पाहातच राहावेसें वाटूं लागलें. सुंदरनें डोळे उघडले, तो तिच्याकडे बघतच होता. तिनेंही त्याच्याकडे बघितलें. नजरेला नजर मिळाली, प्रेमानें प्रेम ओळखलें. हृदयाला हृदय समजलें !

'सुंदर !'

'वसंतराव'

दोनच उद्गार, पण तेवढ्यांत साऱ्या विश्वाचें गूढ उकललें गेलें. किंचित्काळ स्तब्ध होऊन, जरा भानांवर येऊन सुंदर म्हणाली.

'वसंतराव ! एकदम कां परत आलांत ?'

'सुंदर, ज्या जरुरीच्या कामाकरतां मी मुंबईला गेलों त्यापेक्षांही जास्त जरुरीच्या कामासाठीं परत आलों.'

'खरंच का ! काय—'

'सुंदर !'

'काय तें ?'

'तुझी मैत्रीण विमल—'

'हो ! तिच्यावर परवां भयंकर प्रसंग आला होता.'

'पण त्यांत माझा मित्र—'

'यशवंतराव देशमुख ना ?'

'होय ! तो गुंतला गेला आहे.'

'पण खरे अपराधी ते नाहींत—'

'शाबास, सुंदर' तुला पण असंच वाटतं ना ?'

'वाटतच नाहीं तर तें खरंही आहे. विमलनेंच मला स्वतः सांगितलंन् तें सगळं.'

'तसं असलं तर माझं काम फारच सोपें झालें.' असें म्हणून वसंत बिछान्यावर बसला.

'पण काय ग सुंदर, विमल आपल्या साक्षींत तसें सांगेल ना ?' टोपी हाताच्या बोटावर काठी फिरवीत तो म्हणाला.

'होय, सांगेल तर' असें म्हणून सुंदर स्टोकडे वळली.

वसंताला अत्यानंद झाला. आपला मित्र विमलेच्या साक्षीवर खास सुटेल असें त्याला स्पष्ट दिसूं लागलें.

'मग काय ग सुंदर तुझ्या मैत्रिणीवर खरा हल्ला कोणी ग केला ?' वसंतानें विचारलें.

'तें कांहीं बाई तिला नाहीं कळलं. कोणीतरी दोघेतिघे होते एवढं तिला समजलं, अन् तेवढ्यांत हे देशमूख एकदम धांवत आले व त्यांनीं तिला सोडविली.'

'शाबास, यशवंत तसाच धडाडीचा तरुण आहे. आतांच जाऊन, परवानगी घेऊन, मला त्याची गांठ घेतली पाहिजे.'

'हो, पण एवढा चहा तर घेऊन जाल' असें म्हणून सुंदरनें एक नेत्रकटाक्ष वसंताकडे टाकला. आणि चहा घेतल्यावांचून वसंत तरी बाहेर कुठें पडणार होता म्हणा !

त्याच वेळीं शेजारच्या खोलींत गंगू पवार भिंतीला कान लावून उभी होती. ती असूयेनें तप्त झाली होती. सुंदरला कसेंतरी, कुठल्यातरी जाळ्यांत पकडल्यावांचून तिला स्वस्थता मिळणें शक्य नव्हतें. पण सुंदरला याची यत्किंचितही कल्पना नव्हती. बाह्यांगीं भगिनींचें नातें जोडू पाहणाऱ्या गंगू पवारच्या काळ्याकुट्ट हृदयांत सूडाचे कसले भयंकर विचार येत होते याची सुंदरला कल्पना तरी कशी असणार ? ही सारी असुया कां तर आपली शेजारीण पवित्र व सात्विक आहे म्हणून. एवढेंच. स्त्री-स्वभावा ! तुला शतशः प्रणाम असोत ! !

---

## प्रकरण १३ वें.

# " सुटका झाली "



वसंत मित्रप्रेमाच्या तळमळीनें मुंबईहून विलासपुरास ज्यावेळीं एकाएकी परत आला त्याचे दुसरेंच दिवशीं यशवंतावरील खटल्यास सुरवात झाली. गांवांतल्या बऱ्याच लोकांची कोर्टांत झिम्मड उडाली होती. यशवंताचे दंडास दोऱ्या बांधून जेव्हां त्याला आरोपीच्या पिंजऱ्याजवळ नेण्यांत आलें तेव्हां सर्वांचे डोळे त्याच्याकडे खिळून गेले. विमल व सुंदर दोघीही अगदीं पुढच्या बाजूस बसल्या होत्या. त्यांची नजरही त्या हतभागी प्राण्याकडे लागली. पोलिसांचा पुरावा भरभक्कम होताच. प्रत्यक्ष अत्याचाराच्या ठिकाणीं, अत्याचार केलेल्या मुलीचे बूट हातरुमालांत बांधून घेत असतांना आम्ही त्याला पकडलें असा पोलिसांच्या म्हणण्याचा आशय होता. यास साक्षीदार म्हणून मोहन, सर्जा यांची साक्ष होती. आपल्यासाठीं एका उदार तरुणाचा असा हकनाहक छळ होत आहेसें पाहून विमलेला अत्यंत चीड व संताप आला. पण तिची जबानी होईपर्यंत तिला स्वस्थ बसणें भाग झालें. सुंदरला सुद्धां यशवंताच्या दुर्दैवाबद्दल कींव येत होती. वसंत मात्र फारसा काळजींत दिसत नव्हता. यशवंत निर्दोषी सुटणार असें त्याला पक्कें वाटत

होतें. कोर्टांत येतांना तो यत्किंचितही काळजींत नव्हता. उलट त्यानें काग-दांत गुंडाळून कांहींसें बरोबरही आणलें होतें.

यशवंताची उलट तपासणी फार खळबळीची झाली. उत्तरें देतांना तो मुळींच डगमगत नव्हता. त्याचा आवाज खड असून मुद्राही थोडी करारी व निर्भीड अशी दिसत होती.

' आपलें नांव ? '

' यशवंत माधव देशमूख. '

' जात ? '

' बहुतेक मराठा, पण नक्की नाहीं. '

' ह्मणजे ? '

' ह्मणजे माझें जन्मरहस्य मला अज्ञात आहे. '

यशवंताचें हें उत्तर ऐकून तपासणी घेणाऱ्या वकिलाला आनंदाच्या उकळ्या फुटल्या. त्यानें एकदां आपला चष्मा नाकावरून खालीं उतर-विला व तो हातरुमालानें पुसून पुन्हां योग्य स्थळीं चढविला.

' बरें ! हें पहा, पोलीसनें तुम्हांला पकडलें तेव्हां तुम्ही विमलाबाईंच्या जवळ उभे होता ना? '

' होय '

' ते कां ? '

' त्या बेशुद्ध होत्या म्हणून त्यांना शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न करीत होतों. '

' एकुण तुमचं म्हणणं असं कीं तुम्ही कांहीं हा प्रकार केला नाहीं ? '

' नाहीं. असलें अधम कृत्य माझे हातून या जन्मीं तरी होणें शक्य नाहीं ! ' यशवंत हें संतापानें बोलला. क्षणभर कोर्ट स्तिमितच झालें.

' बरं ! तुम्ही जेव्हां त्या जागीं आलात, तेव्हां तिथं कोण होतं? म्हणजे दुसरें कोणी तेथें होतें का ? '

हा प्रश्न ऐकतांच यशवंताच्या निश्चयी मुद्रेवर चलबिचल होऊं लागली. त्याचें एक मन त्याला सांगू लागलें कीं ' यशवंता तूं न्यायासनासमोर उभा आहेस, प्रश्नाचें खरें उत्तर देणें तुझें पवित्रतम कर्तव्य आहे. बोल ! ' पण

लागलीच दुसरें मन असें सांगें कीं ' यशवंता ! या प्रश्नाचें उत्तर खरें दिलेंस तर तूं आपल्या मानलेल्या कां होईना पण पित्याच्या मृत्यूला कारण होऊन पितृघातकी ठरशील ! ' यशवंत गडबडला. मोहनाचें नांव सांगण्याचें, त्याच्या जिभेवर आलें पण तेवढ्यांत संयमन करून त्यानें ' छेः तेथें मला कोणीच दिसलें नाहीं ' असें उत्तर दिलें. बाकी त्या वेळेस जरी त्यानें खरा प्रकार सांगितला असता तरी तो कोणास खरा वाटला असता किंवा नाहीं याची शंकाच आहे. उलट स्वतःच्या सुटकेसाठीं हा इतर सज्जनांवरच खोटें बालंट लोटूं पाहात आहे अशीच बऱ्याच लोकांची त्यावेळीं समजूत झाली असती.

' बरं हा हातरुमाल कुणाचा ? '

' माझा. '

' मग त्यांत हे विमलाबाईंचे बूट कसे हो आले ? त्यांची तुमची तर मुळींच ओळख नव्हती ना ? '

' त्यांची व माझी ओळख नव्हती हें खरें आहे. मी नेहमींप्रमाणें टेंकडीवर फिरावयास म्हणून गेलों होतों. मी नेहमींच उशिरां परत येतों. त्या दिवशीं असाच परत येत असतां—'

' अहो जरा थोडक्यांत उत्तरें द्याल का ? ही कादंबरी नको तुमची आम्हांला. ' वकिलानें खोंचट सूचना केली.

उलट तपासणीचे वेळीं पिंजऱ्यांत सांपडलेल्या प्राण्याला हकनाहक छळण्यांत वकिलांना काय मौज वाटते नकळे. बिचाऱ्या साक्षीदाराची तर अगदीं टर उडवून देण्यास वकीलसाहेब टपलेले असतात. कोणी थोडक्यांत उत्तरें देऊं लागला कीं हे ' अहो, जरा नीट स्पष्ट करून सांगा की ' असें त्यांनीं म्हटलेंच. कोणी जरा जास्त स्पष्टीकरण करूं लागला कीं, ' अहो, अहो, पुरे पुरे ! किती पाल्हाळ करतां. जरा थोडक्यांत सांगा की. ' असें उद्गार यांनीं काढलेच !

वकीलसाहेबांचा टोमणा ऐकून यशवंत मुळींच बावरला नाहीं. तो पुढें बोलूं लागला, ' मी परत येत असतां वाटेंतच हे कोणाचे तरी बूट पडलेले मला दिसले. कदाचित कोणी विसरलें असेल तर ते त्यास दुसरे दिवशीं परत

आणून द्यावेत असें म्हणून मी ते आपल्या हातरुमालांत गुंडाळून घेतले. दुसरे दिवशीं त्या ठिकाणीं जमणाऱ्यांजवळ चौकशी करण्याचा माझा विचार होता.' यशवंताची तपासणी बराच वेळ चालू होती. नंतर थोड्या वेळानें विमलेची साक्ष झाली.

आतांपर्यंत झालेल्या साक्षीपुराव्यावरून यशवंतच खरा दोषी असून आपलें पाप लपविण्यासाठीं त्यानें थापाथापी चालविली आहे असें कोर्टास व इतर लोकांस वाटत होतें. यशवंताच्या बाजूचा असा अद्यापपर्यंत कुठलाच धागा सांपडला नव्हता. विमलेच्या साक्षीस सुरवात झाली तेव्हां कोर्टांत फारच शांतता झाली. झाली तर तिचीच साक्ष महत्त्वाची होणार असें सर्वांना वाटत होतें. यशवंताचेंही तिच्याकडेच सारें लक्ष लागलें. वसंत एकतानतेनें तिचा प्रत्येक शब्द ऐकूं लागला. सुंदरची दृष्टीही कौतुकानें आपल्या मैत्रिणीकडेच लागली होती.

'मी परत येत असतां—' विमल न घाबरतां सांगूं लागली, 'मागून एक व्हिक्टोरिया धांवत येऊन माझ्याजवळ येऊन ठेपली. आंतून दोन तीन व्यक्ती खालीं उतरल्या. नक्की आंकडा मला सांगतां येणार नाहीं. पण कमींत कमी दोन व्यक्ती होत्या हें निश्चित. मी घाबरून पळून जाण्याचा प्रयत्न केला, तोंच एकानें माझा हात धरला. मी घाबरून गेलें. माझे पायाखालची जमीन सरकूं लागल्यासारखें वाटून मी तोल जाऊन खालीं पडूं लागले. तेवढ्यांत कांहीं तरुण मंडळी तेथें आली. पण मला कांहींएक मदत न करतां ते पळत निघून गेले. पुढें मला वाटतें मी बेशुद्धच झालें. मध्यें जेव्हां मी थोडी भानावर आलें, तेव्हां मी एकटीच पडलेली असून कोणीतरी तरुण माझ्याजवळ उभा होता. माझ्यावर हल्ला करणाऱ्या व्यक्ति जवळपास नव्हत्या, त्यावरून माझी किंकाळी ऐकूनच कोणीतरी माझ्या सहाय्यासाठीं आलें आहे हें मी तात्काळ समजलें. मी त्यांना 'कोण आपण ?' असा प्रश्न केल्याचेंही आठवतें. व 'मी यशवंत देशमुख' असें त्यांनीं दिलेलें उत्तरही माझ्या पूर्ण ध्यानांत आहे. लागलीच मी बेशुद्ध झालें.'

विमलेची ही हकीगत ऐकून मात्र कोर्टांत भयंकर खळबळ उडाली खटल्याचा सर्व रंग एकदम पालटला. यशवंताला खरें सत्य जगापुढें शेवटीं

आलेंच हें पाहून अत्यानंद झाला त्याच्या डोळ्यांत कृतज्ञतेचा ओलावा दिसूं लागला. आपल्या चारित्र्यावर निष्कारण ओढवूं पाहणारा कलंक ज्या व्यक्तीनें धुवून काढला, त्या व्यक्तीचे ठिकाणीं, त्या विमलेच्या ठिकाणीं त्याला एक स्वर्गीय–देवता दिसूं लागली. आतां कोर्टानें तरी कसलाही निकाल दिला असता तरी त्याला त्याची पर्वा नव्हती. खऱ्या सत्यशोध-काला खरें सत्य जगापुढें आलें असतां जो कांहीं आनंद होतो त्याचें वर्णन करणें कठीण आहे !

आणि विमलेच्या स्पष्टोक्तीनंतर कोर्ट तरी दुसरा कोणता निकाल देणार ? यशवंताला निर्दोषी म्हणून सोडून देण्यांत आलें एवढेंच नव्हे तर अबले-च्या सहाय्यासाठीं धांवून जाण्याची धडाडी दाखविल्याबद्दल कोर्टानें त्याची स्तुती केली. हा निकाल ऐकतांच कोंपऱ्यांत उभे राहिलेली सर्जा नान्या व मोहन ही तिकडूच शक्य तितक्या त्वरेनें कोर्टाचे आवारांतून निघून गेली. वसंतानें तर यशवंताला अक्षरशः खांद्यावर उचलून कोर्टाबाहेरील आवारांत आणलें. त्यांच्याभोंवतीं प्रेक्षकांचा खूपच गराडा पडला. सुंदर व विमल व विमलचे वडील दादासाहेब लांबून ही मौज पाहूं लागले. यशवंताला बाहेर नेतांच वसंतानें बरोबर आणलेला फुलांचा हार त्याच्या गळ्यांत घातला. कोर्टांत येतांना वसंतानें जें ‘ कांहींसें बरोबर ’ आणलें होतें तें हेंच होय ! यशवंताचे गळ्यांत हार पडतांच भोंवतालच्या मंडळींनीं टाळ्यांचा गजर केला. जे लोक थोड्याच वेळांपूर्वी यशवंताची हेटाळणी करीत होते तेच लोक खरें काय समजतांच त्याची मुक्तकंठानें स्तुति करूं लागले. यशवंतानें गळ्यांतला हार चटकन हातांत काढून घेतला. नंतर वसंतानें यशवंताचा एक हात धरून त्याला ओढीतच विमल व सुंदर उभ्या होत्या तिकडे आणलें. जवळ येतांच ‘ दादासाहेब, हाच तुमच्या मुलींच्या रक्षणासाठीं धावून येणारा खरा सत्यशोधक ! ’

दादासाहेबांनीं पितृवात्सल्यानें यशवंताचें पाठीवरून हात फिरवला. विमलही सलज्ज नेत्रानें यशवंताकडेच पाहात होती.

‘ हें पहा. ’ दादासाहेब आनंदानें म्हणाले. ‘ आतां या ठिकाणीं बोलत बसणें बरें नव्हे. उद्यां सकाळीं सर्व मंडळी आमच्याच घरीं फराळाला

यानात ? काय मिस्टर देशमूख ? ' दादासाहेबांचा हा गोड विचार पसंत पडण्यास उशीर लागण्याचें कारणच नव्हतें. तावडतोब एक व्हिक्टोरिया बोलावून आंत दादासाहेब, सुदर व विमल अशीं तिघेजण बसलीं. यशवंत व वसंत यांनीं पायींपायींच घरीं जाण्याचें ठरविलें. व्हिक्टोरिया चालू होतांना मात्र वसंत सुंदरकडे, व विमल यशवंताकडे पाहून हंसण्यास विसरलीं नाहींत ! !

' वसंत ' घराकडे जातां जातां यशवंत, वसंताचे संभाषण सुरू झालें.

' काय ? '

' तूं कसा अचानक परत आलास ? '

' ही बातमी वर्तमानपत्रांतून वाचतांच तसाच निघालों. '

' खरेंच ! '

' होय रे, मला तिकडे कामच सुचेना. '

' वसंता, तुझ्यासारखे मित्र ज्याला लाभले आहेत तो नशिबवान नाहीं का ? '

' जाऊंदे ! गॉन इज गॉन ! प्लीज डोन्ट प्रेज मी '

रावसाहेब देशमुखांचे घराजवळ येतांच ' अच्छा, यशवंत. मी जातों आतां, तूं ये मग रावसाहेबांना भेटून ' असें म्हणून यशवंत वसतिगृहाकडे वळला, व यशवंत घरांत शिरला घरांत पाऊल टाकतांच, आपल्याला भेटण्यासाठीं रावसाहेब आले नाहींत एवढेंच नव्हेतर ते आज कोर्टांतही आले नाहींत ही गोष्ट यशवंताच्या ध्यानांत आली. मोहनानें आपल्याबद्दल रावसाहेबांच्या मनांत नाना कल्पना भरवून दिल्या असतील व म्हणूनच ते आपणावर संतापले असतील असें त्याच्या मनानें घेतलें. घरांत तळमजल्यावर, गडी माणसें, आचारी माणसें वगैरे मंडळी होती पण त्यानें कोणाकडेही न पाहतां थेट रावसाहेबांच्या खोलीकडे मोर्चा फिरविला. रावसाहेब तापानें फणफणून पडले होते. यशवंताला पकडून नेल्याची बातमी कळतांच त्यांना जो धक्का बसला त्याचवेळीं त्यांचे अंगांत सडकून ताप भरला होता. त्यामुळेंच प्रत्यक्ष हालचाल करून कोर्टांत जाणें किंवा सरकारी परवानगीनें ठाण्यावर जाऊन

यशवंताची गांठ घेणें त्यांना अशक्य झालें होतें. म्हाताऱ्यानें मोहनास तसें करण्यास सांगितलें होतें व मोहननेंही तसें कांहीं एक न करतां म्हाताऱ्याला हव्या त्या थापा दिल्या होत्या.

यशवंत खोलींत गेला तेव्हां म्हातारा विव्हळत अंथरुणावर पडला होता यशवंतानें धांवत जाऊन त्यांच्या पायावर डोकें ठेवलें. यशवंताला सुखरूप परत आलेला पाहतांच रावसाहेबांचा आनंद गगनांत मावेना. तेवढ्या तापांतही म्हातारा तटकन् उठून बसला व त्यानें यशवंताला घट्ट मिठी मारली.

'बाळ यशवंत! आलासना सुखरूप!'

'होय!'

'पण या भानगडींत तूं कसा सांपडलास?' असा रावसाहेबांचा प्रश्न ऐकून यशवंतानें सर्व हकीकत त्यांना सांगितली. ती ऐकून रावसाहेबांना कल्पनातीत समाधान झालें व त्या भरांत 'शाबास यशवंत शाबास! अहाहा तूंच माझा मुलगा असतास तर...' असे उद्गार त्यांच्या नकळत त्यांच्या तोंडून बाहेर पडले.

'रावसाहेब पण—'

'काय बोल?'

'मी एक आणखी प्रश्न विचारूं कां?'

'तुझ्या जन्म बद्दल?' रावसाहेबांनीं कांपऱ्या स्वरांत प्रश्न केला.

'नाहीं! माझ्या जातीबद्दल' यशवंतानें खुलासा केला. तो ऐकून राव-साहेबांनीं बिछान्यावर आंग टाकलें व ते म्हणाले 'नको! यशवंत, त्या-बद्दल जास्त कांहीं विचारूं नकोस कदाचित त्यामुळें तूं......'

'पण मी मराठा—'

'नाहीं, नको यशवंत! ती माहिती माझ्या मृत्यूनंतर तुला कळूं दे!' असें म्हणून म्हातारा लहान पोरासारखा रडूं लागला!

## प्रकरण १४ वें

# ' समाजसेवा '

अकस्मित ओढवलेल्या संकटांतून तितक्याच अकल्पित रीतीनें सुटका झाली त्या दिवशीं रात्रीं यशवंत आपल्या खोलींत विचार करीत पडला होता. वसंतानें गळ्यांत हार घातला, व जनतेनेंही टाळ्या वाजवून त्याचा गौरव केला तेव्हांपासून देशकार्य करण्याची त्याची महत्वाकांक्षा दुणावली होती. परीक्षा झाल्यानंतर कांहीं तरी विधायक स्वरूपाचें कार्य हातीं घेण्याचें त्यानें ठरविलेंच होतें. पण तत्पूर्वी ह्मणजे बी. ए. होण्याचें अगोदर तरी अभ्यास संभाळून आपण कांहीं तरी समाजसेवा कां करूं नये, असा एक विचार त्याच्या मस्तकांत आला. अभ्यास सांभाळून कोणत्या गोष्टी करतां येण्यासारख्या हें तो पाहूं लागला. विचार करतां करतां रोज सायंकाळीं अर्धा तास वीस मिनिटें तरी शहरांतल्या दारूच्या गुत्त्याजवळ जाउन लोकांना दारू सोडण्याची विनंति करून पहावी अशी एक कल्पना त्याला सुचली व पटलीही. अर्थात यांत किितपत यश येईल याची त्याला कल्पना येणें अशक्य होतें. पण सुरवातीस हा प्रयोग करून पहाण्यास कांहीं हरकत नाहीं असे त्याला वाटलें. त्याशिवाय दर आठवड्यांतून फक्त दोन दिवस विलासपुरांत महारवाड्यांत जाऊन रात्रीं तास अर्धा तास तेथील निरक्षर बांधवांना साक्षर करण्याचा प्रयत्न करण्याचेंही त्यानें ठरविलें. विचार करतां करतां आणखी एक कार्य करण्याचें त्यानें निश्चित केलें. दर पंधरा दिवसांतून एके रविवारीं शहराच्या आसपासच्या खेड्यांत जाऊन तेथील लोकांना प्रचलित राजकारणाची थोडी थोडी माहिती देण्याचा उपक्रम करणें हेंच कार्य होय हीं सर्व कामें परिक्षा पास होण्याचें पूर्वीच करावयाची व त्याबद्दल विशेष वाच्यता करावयाची नाहीं हेंही ठरलें. कार्याची अशी रूपरेषा आखल्यानंतर त्याला एक प्रकारचें समाधान वाटलें. निजतांना ' मला माझ्या कार्यांत यश दे ' अशी त्यानें अनन्यभावानें परमेश्वराची प्रार्थना केली.

दुसरें दिवशीं सकाळीं ठरल्याप्रमाणें दादासाहेब देशपांड्यांच्या घरीं फराळाचा कार्यक्रम झाला. वसंत, यशवंत व सुंदर तिघेजण उपस्थित होते. दादासाहेबांनीं तर मुक्त कंठानें यशवंताची स्तुति चालविली होती.

यशवंतराव, तुमच्यासारखे तरुण आमच्या विलासपुरांत आहेत याबद्दल मला अभिमान वाटतो. असे त्यांनीं उद्गार काढले, व त्यावर 'मी आपलें कर्तव्यच केलें यापेक्षां जास्त कांहीं नाहीं.' असें यशवंतानेंही विनयानें उत्तर दिलें.

तरीपण याप्रसंगीं यशवंताला विमलेशीं मामुली शब्दांपलीकडे फारसें बोलतां आलें नाहीं. 'यशवंतराव, कॉफी घेतां का थोडा' 'नको आतां पुरे' किंवा 'थोडीं द्राक्षं घ्या ना' 'बरं घेतों थोडीं' इत्यादि प्रश्नोत्तरांखेरीज जास्त संभाषण झालें नाहीं. फराळाचा कार्यक्रम संपण्यापूर्वीं थोडावेळ मात्र जरा गम्मत झाली. दादासाहेब तरुण मंडळींस आपला त्रासतरचळ नको म्हणून मुद्दाम खालीं निघून गेले. तेव्हां सुंदर, विमल, वसंत व यशवंत अशी चार तरुण मंडळीच फक्त येथें राहिलीं. दादासाहेब निघून गेल्यावर मंडळींना जास्त मोकळेपणा वाटूं लागला.

'काय बुवा यशवंत चलायचं ना आतां ?' वसंतानें जांभई देत विचारलें

'चला' यशवंत उद्गारला.

'बसा कीं जरा थोडा वेळ' विमलेनें विनंतिवजा शब्द टाकला. तिला यशवंताच्या सान्निध्यांत लाखमोलाचा आनंद वाटूं लागला होता. तेवढ्यांत सुंदर हात धुण्यास म्हणून गच्चीवर गेली व तेथूनच 'वसंतराव हें पहा काय आहे. इकडे या. असें म्हणाली. वसंत प्रेमाचा बंदा गुलाम होता. सुंदरच्या प्रेमासाठीं आत्मार्पणही करण्यासही त्याची तयारी होती. मग तिची असली साधी विनंति तो कसा अमान्य करील ? तो लागलीच गच्चीवर गेला. वसंत बाहेर येतांच 'तुमची कशाला त्यांच्यांत लुडबुड ?' असें म्हणुन मिष्कीलपणानें हंसली. वसंतानें तो डांव ओळखला व 'त्यांची तरी कशाला आपल्यांत लुडबुड !' असें म्हणून तोही लबाड हंसला.

आंत खोलींत फक्त दोनच व्यक्ती राहिल्या. एक विमल व दुसरा यशवंत. सुंदरनें वसंताला मुद्दामच बाहेर बोलावलें हें विमलच्या ध्यानांत आलें नाहीं

असें नाहीं—तिला आनंद झाला. तिला जरा चमत्कारिक वाटलें. ती जरा लाजली. यशवंताची स्थितीही तशीच झाली. त्यालाहि आनंद झाला त्यालाही जरा चमत्कारिक वाटलें. तोही जरा लाजला! दोघांनीं परस्परांकडे निरखून बघितलें.

'विमलाबाई,' यशवंतानें बोलण्याचें साहस केलें. 'आपल्याला मदत करण्याची सुसंधी मिळाली हें माझें महद्भाग्य आहे.

'यशवंतराव, तुमचे कसे आभार मानावे हेंच मला कळत नाहीं' विमलेच्या तोंडून हे शब्द कसेबसे बाहेर पडले. बराच वेळ एक अक्षरही न बोलतां दोघेजण परस्परांकडे पाहात राहिले. जणूं काय दोन संगमरवरी दगडाचे पुतळेच एकमेकांकडे पाहात आहेत. प्रेममय वातावरणांत त्यांची प्रेममय समाधी लागली. मदनाचे हस्तक त्यांच्याभोंवताली हिंडूफिरूं लागले मदनानें एकाच वेळीं आपल्या पुष्पधनुष्यावरून दोन बाण सोडले यशवंत व विमल यांच्या सात्त्विक हृदयांत ते बाण खोल खोल रुतून बसले. तेवढ्यांत मिस्कीलपणें हंसत व खोंकत खोंकत वसंत व सुंदर दोघेही गच्चीवरून आंत आली, प्रेमळ समाधीचा भंग झाला!

त्याच दिवशीं सायंकाळीं ठरविल्याप्रमाणें यशवंत दारूच्या गुत्त्याकडे निघाला. त्यावेळीं बरेच लोक दारूच्या गुत्त्यापुढें जमत होते. दिवसभर गिरणींत काबाडकष्ट करणाऱ्या दुर्दैवी मजुरानें हाच रस्ता धरला होता. रस्ते झाडणाऱ्या हतभागी पामरांचें पाय इकडेच वळत होते. दिवसभर 'स्वाऱ्या' करून दमलेल्या दुबळ्या मनाच्या टांगेवाल्यांनें आपले घोडे याच बाजूला दामटले होते. सारें आयुष्य गटार मोऱ्या साफ करण्यांत घालविणाऱ्या अज्ञान दीन पण थोर अशा अभाग्यांचें याच बाजूला लक्ष लागलें होतें! त्यांना आतां मुलाबाळांची पर्वा नव्हती त्यांना घरादाराची पर्वा नव्हती. फार काय पण त्यांना स्वतःचीच पर्वा नव्हती. कित्येकांच्या अर्धवट मोडलेल्या दरिद्री झोंपड्यांतून उपासमारीनें मरणोन्मुख झालेल्या लहानग्या अर्भकांच्या दीनवाण्या किंचाळ्या फुटत होत्या कित्येकांच्या घराभोंवतीं सावकारी सर्प घिरट्या घालीत हिंडत होते. यांतील कित्येकांच्या मायभगिनींना दारिद्र्याच्या धगधगींत ज्वाला असह्य होऊन, पोटाची खळगी भरण्यासाठीं अब्रूचाहि होम करावा लागत होता. कित्येक तरुणींच्या फुटक्या कपाळावरचा पवित्र

कुंकुमतिलक पार साफ होण्याच्या बेतांत होता. पण या लोकांना या कर्म-कटकटीचा वीट आला होता. त्यांचे पाय दारूच्या गुत्त्याकडेच धांव घेत होते. किती शोचनीय ही दशा ! आणि अशा बंधूंना तारता हात देण्या-ऐवजीं आम्ही मात्र शुकाचे देशभक्त म्हणवून लौकिक वाढविण्यांत दंग ! अशा बंधूंना जीवाभावानें मदत करण्यांत जर आम्ही गुंतलों, तर सव्वा हात जीभ लांब काढून, घसा फोडफोडून, टाळ्यांचा कडकडाट उत्पन्न करून, लेक्चरबाजी कोण करील ? ब्राह्मण ब्राह्मणेतर वाद निर्माण करून परस्परांची टाळकी फोडून दोघांचाही पूर्ण नाश कोण करून घेईल ? स्वतःच सत्यशो-धक अशी खरोखरच सोज्वळ असलेली पदवी जोडून भटांच्या पोरींवर अत्याचार करण्याचें पवित्र कार्य मग कोण करील ? देशभक्तीच्या पांघरू-णाखालीं फंडाचा पैसा गडप करून अज्ञान जनतेचीं नरडीं दाबण्याची गुंड-गिरी कोण करील ? दुसऱ्यांस ' अश्लील ' ' बीभत्स ' अशी विशेषणें लावून स्वतः मात्र कुमारिकांच्या कौमार्यावर किंवा पतिव्रतांच्या पातिव्रत्यावर दर-वडा घालण्याचा सुंदर उपक्रम कोण करील ? ' भटांच्या पोरी ना, सगळ्या पाजी ' असें म्हणून ब्रह्मद्वेषी लोकांकडून गौरव करून घेण्याचा नादानपणा कोण करील ? आमच्या देशबांधवांना सक्रीय सहानुभूति जर आम्ही दाखवूं लागलों तर जातीजातींत वैमनस्य कोण वाढवील ? ब्राह्मण ब्राह्मणेतरांत मराठे मराठेतरांत द्वेष कसा उत्पन्न होईल.

यशवंत गुत्याजवळ जाऊन उभा राहिला. त्याचा हा पहिलाच प्रसंग असल्यामुळें तो जरा बावरला होता. तेवढ्यांतच एक रस्ते झाडणारी महा-रीण गुत्त्यांत शिरली. हें दृश्य पाहून यशवंत थक्कच झाला. स्त्रियासुद्धां व्यस-नाधीन झालेल्या पाहून त्याला आश्चर्य वाटलें यांत नवल तें काय ? ती स्त्री गुत्त्यांत गेली तोंच आंतल्या बाजूस बेहोष झालेल्या चारदोन मुसलमान गुंडांनीं ' आयये ! प्यारी अंबूजान ' अशा शब्दांनीं तिचें स्वागत केलें. बाहेरून हा प्रकार पहाणाऱ्या यशवंताचे डोळे रागानें लाल झाले. पण करणार काय !

ब्राह्मणांच्या पंक्तीस बसून अन्नभक्षण करण्याचा अट्टाहास धरणाऱ्या अस्पृश्य बंधूनों ! प्रथम आपल्या समाजांतल्या लोकांना मदत करा. त्यांना

सुधारण्याचा प्रयत्न करा. तसें झाल्यानंतर ब्राह्मणांच्या पंक्तीस बसून जेवण्याची हांव धरण्याचें कांहींच कारण उरणार नाहीं ! उलट अशा देवस्वरूप अस्पृश्यांच्या चरण-वंदनासाठीं ब्राह्मण समाजाचीही गर्दी झाल्याविना राहणार नाहीं.

अंबू महारीण गुत्त्यांत गेल्यानंतर थोड्याच वेळांत तर्रर्र होऊन सांवळा गोंधळ घालूं लागली. यशवंताला तो किळसवाणा प्रकार बघवेना. आज एखाद्याला तरी मदिरेच्या दाढेंतून परत फिरविण्याच्या इर्षेनें तो इकडे आला होता खरा, पण त्या ठिकाणीं तो अमंगल प्रकार बघत उभे राहणें अशक्य झालें. तो तेथून परत फिरण्यास निघाला. तरीपण दुसरे दिवशीं तेथेंच परत येऊन पुन्हां प्रयत्न करून पहाण्याचा त्याचा निश्चय मात्र डळमळला नाहीं. परत फिरणार तों मागून त्याच्या खांद्यावर कोणीसा सहज हात टाकला.

खांद्यावर हात टाकणारी व्यक्ति पाहून यशवंतानें विचारलें, 'कोण ? काय पाहिजे तुम्हांला ?' त्या व्यक्तीची दाढी वाढलेली असून डोक्यावर कांहींच नव्हतें. अंगांतील कोट फाटका असून, सदऱ्याला तर गुंड्याच नव्हत्या. 'साहेब मला चार आणे द्याहो.' ती व्यक्ति दीनवाण्या मुद्रेनें म्हणाली. 'चार आणे ? ते कशाला ?' 'मला थोडी घ्यायची आहे.' हे शब्द त्या व्यक्तीनें इतक्या दीन आवाजांत उच्चारले कीं यशवंताचें अंतःकरण पिळवटून गेलें.

'हें पहा ! मी तुम्हांला चार आण्याचें दुसरें कांहीं तरी घेऊन देतों.'

'छे हो दुसरं नको कांहीं मला !'

'ते कां ?'

'साहेब नका छळूं मला, द्या असतील तर, गरिबावर उपकार होतील.'

'छेः छेः ! दारूसाठीं मी तुम्हाला एक छदामसुद्धां देणार नाहीं. पण—' यशवंताचे इतर उद्गार ऐकण्याची त्या व्यक्तीला जरूरी दिसली नाहीं, यशवंत वाट चालूं लागला.

पहिल्याच दिवशीं यशवंताला असले कटु अनुभव मिळाले पण तो निराश झाला नाहीं. एक दोन दिवसानंतरच तो विकासपूरांतील महार-

वाड्यांत गेला. बरोबर त्यानें एक कंदील चार पांच पाट्या कांहीं पेन्सिली व धुळाक्षरांची पुस्तकें घेतली. महारवाडा ह्मणजे त्यांत लहान लहान खोपटांची घरकुलें होतीं. हा गेला तेव्हां रात्रीचे असे आठ वाजले होते. कुत्रीं भुंकूं लागलीं. कांहीं पोरें याच्याभोंवतीं जमलीं. यानें एकदम पिंपळाच्या पारावरच तळ दिला. भोंवताली तळ दिला. भोंवताली जमलेल्या पोरांना मोठ्या खुबीनें शिक्षण देण्यास यानें सुरवात केली. पोरांनाही हा प्रसंग जन्मांत पहिलाच असल्यामुळें अतिशय मौज वाटली. एक लहान 'केन्या' नांवाचा मुलगा तर 'साहेब! मला हें चित्राचं पुस्तक द्याल कां?' असें यशवंताला एकसारखा विचारूं लागला. त्यानेंही 'रोज जर तुह्मी इथं येऊन शिकाल तर मी तुह्माला पुष्कळ रंगीत रंगीत चित्रांचीं पुस्तकें देईन' असें ह्मणून त्यांचें समाधान केलें. तेवढ्यांत एक बाई 'अरं केन्या! अ केन्या, कुटं हैस' असें ह्मणत पाराकडे आली. यशवंताचें सहज तिच्याकडे लक्ष गेलें तो चपापला, ती बाई दारूच्या गुत्त्यांत त्यानें बघितलेली 'अंबू' जानच होती.

'कोन बसलं हे ए' अंबू ह्मणाली.

'मी या मुलांना शिकवायला आलों आहे.'

'मजी मास्तूरबावा काय तुह्मी?' अंबू विलासपूरांतील एका शाळेसमोरचाच रस्ता झाडीत असे.

'हो हो! मी इथं नेहमीं येणार आहे.'

'अगं बया' असें उद्गार काढून अंबू थक्क झाली. त्याच क्षणीं 'या स्त्रीला आपण दारूच्या व्यसनापासून सोडवावयाचेंच.' असें यशवंतानें मनानें घेतलें.

यशवंताचा कार्यक्रम असा नेटानें सुरूं झाला. परीक्षा जवळ आल्याकारणानें त्यानें अभ्यासही जारीनें सुरू केला. त्याच्या आयुष्यांत सार्वजनिक कार्याला प्रोत्साहन देणास अशा रीतीनें एक माला व एक बाला कारणीभूत झाली. ही सर्व प्रेरणा विमलेच्या दर्शनानें झाली हें त्याला कळून चुकलें. विमलेची मूर्ती त्यानें आपल्या हृदयावर कोरून ठेवली. तो त्या मूर्तीची मनांतल्या मनांत एकतानतेनें सेवा करूं लागला. थोडेच दिवसानंतर त्यानें

आपल्या प्रिय मित्राला सुंदरच्या वसंताला ह्या सर्व कार्यक्रमाची माहिती सांगितली.

' वसंत ! अशा तऱ्हेनें मी सुरवात केली आहे. '

' यशवंत ! तुझ्याबद्दल मला अभिमान वाटतो तो एवढ्याचसाठीं. '

' पण वसंत, मी गुत्त्याजवळ उभा राहून दारू सोडण्यासाठीं लोकांना विनंती करतो, ही गोष्ट बऱ्याच लोकांना आवडत नाहीं. '

' यशवंत, कोणती चांगली गोष्ट लोकांना एकदम पसंत पडली आहे. '

' हो तेंही आहेच. '

' यशवंता, माझाही विचार ठरला. '

' काय ? '

' मी पण तुझ्याबरोबर येणार. '

' मग तर मौजच होईल. मी पण तुला हेंच विचारणार होतों.

यशवंताला मदतनीस मिळाला व तो त्याचा जिवलग मित्रच ! यशवंताचा उत्साह शतपट वाढला. त्या भरांतच तो म्हणाला, ' वसंत आपली मैत्री अशीच अक्षय टिकेल ना ?

' अलबत, खात्रीनें टिकणार. '

' पण—'

' पण काय ? '

' कांहीं नाहीं. ' दोघेही फिरावयास जाण्यास उठले.

---

# प्रकरण १५ वें.

# " पत्राची भानगड ! "

अत्याचारानंतर उडालेली खळबळ, यशवंताच्या सुटकेनंतर हळू हळू शांत होऊं लागली. मात्र पोलिस अधिकाऱ्यांना खरा अपराधी अद्याप सांपडला नव्हता. खरा अपराधी धरून दिला तर मग ते विलासपूरचे पोलीस कसले ? कांहीं दिवस लोटल्यानंतर विमल व सुंदर या दोघी मैत्रिणी पूर्ववत् टेंकडीच्या

बाजूस फिरावयास जाऊं लागल्या होत्या. अलीकडे त्या अंधार पडण्याचें आंतच घरीं येत आणि मौज अशी कीं त्या हल्लीं लहानशा तीक्ष्ण धारेच्या सुऱ्या बरोबर बाळगू लागल्या होत्या, ही नवीन कल्पना सुंदरच्या मस्तकां-तून निघाली होती. ज्या शहरीं भर दिवसाढवळ्या अबलावर अत्याचार होऊं शकतात त्या ठिकाणच्या अबलांनीं संरक्षणाची स्वतःच तयारी केली पाहिजे असें सुंदरचें निर्भीड मत होतें. ज्या ठिकाणचा पुरुषवर्ग स्वराज्य व स्वातंत्र्य मिळविण्यांत इतका दंग झाला आहे कीं, त्याला महिलावर्गावर होत असलेल्या अत्याचारांकडे लक्ष देण्यास थोडीही फुरसद नाहीं, त्या ठिकाणच्या मायभगिनींनीं स्वसंरक्षणासाठीं स्वतःसच सिद्ध करणें जरूर नाहीं काय ? खरोखर आमचा स्त्रीसमाज जर असा धीट बनेल तर त्यांकडे वांकड्या नजरेनें पाहण्याची कोणाची छाती होणार ? अंगावर येणाऱ्या रंगेल निल्ला-जऱ्याला लाथेखालीं तुडविण्याचा धीटपणा जर आमच्या भगिनी दाखवूं लागतील तर—पण हा सोन्याचा दिवस उगवेल काय ?

आज त्या दोघी मैत्रिणी अशाच टेंकडीवर फिरावयास निघाल्या होत्या

‘ सुंदर ’

‘ अं ’

‘ अभ्यास केलास तू सुरू ? ’

‘ नाहीं ग अजून ’

‘ मग ’

‘ मग काय ? ’

‘ केव्हां करणार ? ’

‘ खरं सांगू कां तुला ? ’ सुंदर किंचित स्मित करीत, हळूंच म्हणाली.

‘ काय, काय तें ? ’ विमलेनें विचारलें.

‘ माझं अभ्यासाकडे लक्षच लागत नाहीं. ’

‘ अगबाऽऽई, तें कां ? ’

‘ कुणास ठाऊक ! ’

दोघी बराच वेळ हंसत होत्या.

‘ सुंदर ’

'काय ह्मणतां विमलपंत ?'

'मग आतां नाहींच कां करायचा अभ्यास ?'

'वाहवा ग'

'काय ?'

'करायचा तर !'

या वेळीं दोघीही टेंकडीवरील बागेंत जाऊन पोंहोंचल्या होत्या. त्या ठरावीक ठिकाणीं, एका झाडाखालीं जाऊन बसल्या. तेथून विलासपूरचें शहर, गर्द छायेंत झांकून गेल्यासारखें दिसत होतें. बागेंत करीच नव-परिणित जोडपीं हिंडत होतीं. झाडांवरून पक्ष्यांचे प्रेमळ आलाप निघत होते. शीतल वाऱ्याची मंद झुळूक येतांच वृक्षलतांच्या अंगावर रोमांच उभे राहून त्यांचीं पानें आनंदानें थरारूं लागत. असेंच एक प्रेमी जोडपें सुंदर व विमल बसली होती तेथूनच फिरत फिरत टेंकडीच्या मागील बाजूस गेलें. जोडप्यांतील तरुणीचे डोळे आनंदातिशयानें चमकत होते. ती मधून मधून शेजारच्या तरुणांशी लडिवाळपणें बोलत होती. या जोडप्याकडे पाहतांच सुंदरला क्षणभर त्या तरुणीच्या जागीं तिचें स्वतःचेंच प्रतिबिंब दिसूं लागलें, व त्या तरुणाच्या जागीं तिला तिच्या वसंताची रम्य मूर्ती दिसूं लागली. तें प्रेममय दृश्य पाहतांच दोघींच्याही हृदयाला गुदगुल्या झाल्या. एक निश्वास टाकला. त्याच वेळीं विमलेनेंही एक निश्वास टाकला. सुंदरचा निःश्वास विमलनें ऐकला. विमलेचा निश्वास सुंदरनें ऐकला त्या अदृश्य होणाऱ्या जोडप्याकडे वेधलेले नेत्र दोघींनी परस्परांकडे वळविले. सुंदरचा कान पकडून विमल खोंचकपणें हंसली, व सुंदरला अधिकच खेटून बसली.

'सुंदर ! माझं एक काम करशील कां ?'

'आतां कामांत गुंतला वाटतं आपण !'

'आपण नाहीं कां गुंतलांत !'

'मी कुठं नाहीं ह्मणते आहे'

'हो मग मी पण—'

'आहेत, आहेत दिवस आहेत' असें एखाद्या वयोवृद्ध ज्ञात्याप्रमाणें पोक्त व गंभीर उद्गार काढून, सुंदर गाल फुगवून, वर आकाशाकडे बघूं लागली.

‘ सुंदर ’ विमल जरा रागावूनच ह्मणाली ‘ आतां थट्टा पुरे कर कीं, ’

‘ ह्मणजे मी थट्टा कां करते आहे ? ’ सुंदर उद्गारली.

‘ नाहींतर काय ? ’

‘ कशावरून ’

‘ काय मला कळत नाहीं वाटतं ! ’

‘ बरं बाई, मग काय करू ह्मणतेस ? ’

‘ सुंदर, तूं माझं एक काम कर ’

‘ हें काय ? ’

सभोवतालीं ‘ कोणी नाहीं अशी खात्री करून विमल हलक्या स्वरांत ह्मणाली ‘ पण माझी थट्टा नाहीं ना करणार ! ’

‘ नाहीं. नाहीं. नाहीं ! ’

‘ मग तूं आपल्या खोलींत त्यांना बोलावशील कां ! ’

विमलेनें सांगितलेले हे ‘ ते ’ कोण, तें सुंदरनें तेव्हांच ओळखलें. तिलाही आतां विमलेची थट्टा करावीसें वाटेना.

‘ विमल, देशमुखानांच ना ! ’

‘ हो ’

विमलेच्या मनांतून यशवंताशीं पुष्कळच बोलावयाचें होतें. व त्या साठींच त्याला बोलावयाचें होतें व त्यासाठींच त्याला बोलावण्यास विमलेनें सुंदरला विनंती केली.

‘ सुंदर, तुझ्या वसंतरावानांच सांग त्यांना बोलवायला. ’

‘ छे, वसंतराव कशाला ? ’

‘ मग ? ’

‘ मग काय ? मीच स्वतः यशवंतरावांना चिठ्ठी पाठवीन. कधीं बोलवायचं त्यांना ? ’

‘ कधीं बरं बोलवायचं त्यांना ? ’

‘ कधीं बरं बोलवावं ? ’

‘ परवां, रविवारीं. ’

‘ चालेल. ’

'पण काय ग विमल तूंच आपल्या घरीं कां नाहीं त्यांना बोलावत ? कां दादासाहेबांच्यासमक्ष सारं बोलतां नाहीं यायचं !'

'चल, चावट कुठली. पण करशील ना एवढं ?'

विमलेचें अंतःकरण एका लबाड चोरानें हिरावून नेलें होतें. व ही गोष्ट स्पष्टपणें त्या चोराजवळ कबूल करावी असें विमलला वाटत होतें. यशवंताजवळ आपलें हृद्गत स्पष्टपणें बोलावें असें विमलनें ठरविलें होतें. व त्यासाठींच त्याला सुंदरच्या खोलींत बोलावण्याची युक्ती तिनें काढली होती. यशवंताचें हृद्गत तिनें केव्हांच ओळखलें होतें. प्रेमाच्या बातम्या अशा गुप्तपणेंच कळत असतात. प्रेमाच्या तारायंत्राला शब्दांची जरूरी नसते. पण एकदां प्रेमानें प्रेमाला ओळखलें कीं गोड गुपितें करतांना सारा शब्दकोश अपुरा वाटूं लागतो.

त्याच दिवशीं रात्रीं वसतिगृहांतील आपल्या खोलींत सुंदर परत आली व लागलीच टेबलाजवळ जाऊन तिनें एक छोटें पत्र तयार केलें. तें पत्र ती स्वतःच दुसरे दिवशीं कॉलेजांत यशवंताचे हातांत देणार होती. पत्र लिहून तयार होतांच तें तसेंच टेबलावर ठेऊन ती उठली, व तेवढ्यांत क्लबांत जेवण्याची घंटा झाल्यामुळें ती क्लबाकडे निघाली. जातांना स्वतःच्या गळ्याभोंवती तो स्कार्फ गुंडाळण्यास मात्र ती विसरली नाहीं,

सुंदर बाहेर पडून पांच एक मिनिटें झाली असतील—नसतील तोंच गंगूबाई 'सुंदर सुंदर' अशा हांका मारीत लोटलेले दार उघडून सुंदरच्या खोलींत शिरली. आंत पाऊल टाकतांच सुंदर खोलींत नाहीं हे तिच्या ध्यानांत आलें. ती परत जाण्यासाठीं मागें फिरणार तोंच तिची नजर टेबलावरील पत्राकडे गेली. तिचें सुंदरवर काय प्रेम हे तें हें वाचकांना ठाऊकच आहे. कित्येकांना दुसऱ्यांची पत्रें वाचण्याचें जबरदस्त व्यसन लागलेलें असतें. गंगू असल्या व्यसनांपासून अलिप्त नव्हती आणि त्यांतून हें पत्र सुंदरचें ! मग तें वाचल्याखेरीज गंगूबाईला चैन पडणें अशक्य होतें. गंगूनें तें पत्र वाचलें. तिनें एकवार सभोंवार बघितलें. तिच्या मस्तकांत तत्क्षणींच एक शक्कल चमकली. तिनें तें पत्र पोलक्याच्या खिशांत घातलें व अत्यंत समाधानानें, खालच्या

ओठ दातांनी घट्ट दाबून ती निमूटपणें बाहेर पडली. क्लबांत गेल्यावर तिला तेथें सुंदर दिसली. परन्तु पत्राबद्दल तिनें तिला कसलाच मागमूस लागूं दिला नाहीं. सुंदरला तरी कशी व कसली शंका येणार! त्याच रात्रीं गंगू पवार नेहमींच्या संवयीप्रमाणें कोणाच्या नकळत रात्रीं बाहेर जाऊन आली.

सुंदर क्लबांतून जेवण उरकून एक गाण्याची ओळ गुणगुणत परत खोलीकडे आली. बराच वेळ ती खोलींतल्या खोलींत इकडे तिकडे हिंडून शतपावली करुं लागली. मनुष्यप्राणी एकटाच असला कीं विचारांची फुल पांखरें त्याच्या भोंवतीं घिरट्या घालूं लागलींच ह्मणून समजावें. विचार हेच मनुष्यप्राण्याचें एकान्तातील सोबती होत. हिंडतां हिंडतां सुंदरला मैत्रिणीबद्दल विचार सुचूं लागले.

'मला वाटलंच होतं कीं लवकरच विमलसुद्धां माझ्यासारखीच प्रेमाच्या जाळ्यांत सांपडणार. अहाहा! खरोखर विमल–यशवन्त यांच्या सात्विक प्रेमाचें दृश्य—पण त्यांचें लग्न लागणें कसें शक्य होईल? विमल—ब्राह्मण आणि देशमूख तर मराठा जातीचे आहेत ह्मणतात. खरंच, विमलच्या ध्यानांत ही गोष्ट आली असेल कां?। आणि मी! माझें तरी काय? मी कायस्थ, आणि माझे वसंतराव ब्राह्मण. काय ही जातीची बंधनें. या बंधनाच्या पलीकडे आह्माला कधींच कां जातां येणार नाहीं! आमचें प्रेम, आमचें ध्येय, आमचें आयुष्य सारें सारें या—बंधनांच्या दडपशाहीखालींच कां चुरडले जावेत?—पण यशवन्तराव देशमूख विमलेवर तितक्याच उत्कटतेनें प्रेम करीत असतील कां!

याच वेळीं सुंदरला एकदम तिनें टेबलावर लिहून ठेवलेल्या पत्राची आठवण झाली. सहज पुन्हां एकदां तें पत्र वाचून बघावें असें ह्मणून ती टेबलाजवळ गेली पण पत्र टेबलावर नव्हतें. ती एकदम चमकली. पत्र लिहून टेबलावरच ठेवल्याचें तिला नक्की आठवलें. एकदोन पुस्तकें उघडून तिनें बघितलीं. टेबलाचे खण धुंडाळले, पोलक्याचे खिसे तपासले. बिछान्यावरील उशा पाहिल्या. पण छे, पत्राचा पत्ता नाहीं. जरा वेळ पत्राचें काय झालें असेल याचा तिनें विचार केला पण तिला कांहींच उलगडा होईना. एकवेळ तिला, आपण पत्र तरी खरेंच लिहिलें होतें ना अशी शंका आली.

कदाचित वाऱ्यामुळेंही टेबलावरचें पत्र उडून खिडकीवाटें बाहेर गेलें असेल असेंही तिला वाटलें. अशा प्रकारच्या नाना असंभाव्य गोष्टी तिला आतां शक्य वाटूं लागल्या. शेवटीं मनाचें कसेंतरी समाधान करून तिनें दुसरें एक पत्र तयार केलें. तरी पण तिच्या मनाची चुटपुट कांहीं कमी होईना. 'पत्राचें झालें काय ?' हा एकच तीन अक्षरी मंत्र तिला सतावून सोडूं लागला. त्याच प्रक्षुब्ध मनःस्थितींत तिनें बिछान्यावर अंग टाकलें. दोन तास ती एकसारखी तळमळत होती. शेवटीं महत्प्रयासानें तिला झोंप लागली.

पण सकाळीं उठल्यानंतर मात्र तिला फारच हुषारी वाटूं लागली. आदल्या दिवशींच्या रात्रीं चमत्कारिक रीतीनें हरवलेल्या पत्राची आतां तिला आठवणही होत नव्हती. नित्याप्रमाणें तिनें स्टो पेटविला. तेवढ्यांत सहजच तिचें साखरेच्या डब्याकडे लक्ष गेलें. डब्यांत साखर मुळींच शिल्लक नव्हती. आदल्या दिवशींच साखर आणावयास-हवी होती. पण एवढें लक्षांत रहावें कुणाच्या ! साखरेचा डबा हातांत घेऊन, त्यावर बोटें वाजवीत सुंदर शेजारच्या खोलींत गेली. गंगू पवार आदल्या रात्रीं पळविलेलेंच पत्र वाचत, त्यावर आपला डांव रचीत होती. सुंदर आंत येतांच तिनें झटकन घडी करून तें पत्र पोलक्याच्या खिशांत दडविलें. ती घाबरली होती. आपण पत्र पळविल्याची बातमी सुन्दरला समजली कीं काय अशीच तिला भिती वाटत होती. गंगू जितकी कपटी, जितकी पापी, तितकीच भित्री होती.

' गंगू ! साखर आहे कां गं तुझ्याकडे ?' हा सुन्दरनें सहजपणें विचारलेला प्रश्न ऐकून मात्र तिचा जीव खालीं पडला. तिनें लागलीच लटकें हंसू तोंडावर आणलें.

' काय ? '

' साखर '

' अगबाई हो. पुष्कळ आहे कीं '

' मग दे बरं थोडी मला '

' का कुणी चहाला कां आलं आहे ? '

' छेः ग, मलाच '

'अग मग इकडेच ये की चहाला'

'मग साखर घेऊन तूंच येईनास माझ्याकडे'

'बरं चल, टाक दोन कप'

'दॅटस् लाइक गंगू!' असें शब्द उच्चारून, सुन्दर परत गेली. गंगूहि तिच्या मागोमागच गेली.

'सुन्दर! आज मी आले पण उद्यां मात्र तू सकाळीं माझ्याकडे आलें पाहिजे' गंगू खोट्या लडिवाळपणें ह्मणाली.

'नो. नो.'

'कां!'

'माझ्याकडे उद्यां गेस्ट येणार आहेत'

'असं कां. मग नको' असें ह्मणून खिडकी बाहेर पाहात गंगूनें एक विकट हास्य केलें!!

---

## प्रकरण १६ वें.

# "जाळें टाकलें"

सुंदरच्या खोलींतलें पत्र चोरल्यानंतर क्लबांतून जेवण उरकून येऊन, ज्या वेळीं गंगू पवार रात्रीं बाहेर पडली, त्याच वेळीं मोहन व त्याचा मित्र नान्या चांदण्यांत रस्त्यांतून हिंडत होते. तो रस्ता ज्या आळींतला होता ती आळी वेश्यांच्या निवासस्थानाबद्दल प्रसिद्ध होती. रस्त्यांत गर्दीही बरीच होती व भोंवतालच्या माड्यांतून कुठें कुठें संगीत ध्वनी ऐकूं येत होता. सर्जा यावेळीं मोहन व नान्या याजबरोबर नव्हता. अलीकडे रात्रीचा तो यांचेबरोबर भटकत नसे एवढेंच नव्हे तर त्यांना तो आपल्या घरींही येऊं देत नसे. रस्त्यां-तून टोपी वांकडी करीत, व मधून मधून इकडे तिकडे पाहात जातांना या मित्रांचें संभाषण चालूच होतें.

'नान्या, पाहिलीस कां ?' मोहनानें डोळे मिचकावून विचारलें. नान्या वर पाहूं लागला.

'मग काय ?'

'अहं. आज नाहीं.' असें नान्या ह्मणतांच दोघें पुढें चालूं लागले. एका दुकानांतून सिगारेटचें एक पॅकेट घेऊन व प्रत्येकीं पानाच्या दोन दोन पट्टया तोंडांत कोंबून थोबाड रंगविण्यास अर्थातच ते विसरले नाहींत.

'कायरे नान्या, हा सर्जा आपल्याला रात्रीचा कां गुंगारा देतो रे ?'

'अरे सांगितलं ना मागें तुला एकदां ! !

'काय ?'

'हं, हं, हं.' नाकाच्या उजव्या बाजूवर बोट उडवून मागील खेपेप्रमाणेंच साभिनय संगीत अभिनय नानाजीनें केला.

'अरेच्चा, असें काय ?

'मग काय तर ?'

'नान्या येतोस कां त्याच्याकडे आतां ?'

'छेरे ! तो रात्रीं येऊं देत नाहीं कुणाला !'

'मग ?'

'मग काय जाऊं दे. मरूं दे जाऊं उद्या सकाळीं.'

नान्यानें असें उत्तर दिलें तरी सर्जाकडे एकवार जाऊन खरा प्रकार काय आहे तें समजावून घेण्याचा विचार मोहनाच्या शिरांतून सुटेना.

'नान्या' एक पिचकारी टाकून वर एक झुरका घेऊन मोहन बोलला. 'सर्जा दार लावून घेतो कां रे ?'

'हो मग, तो काय एवढा मूर्ख आहे काय ?'

'पण त्याच्या घराला मागच्या बाजूला एक दार आहेना ?'

'हो आहे'

'तें तर नसतं ना बंद ?'

'नाहीं. आणि असलंच बंद तर तिकडे त्याची म्हातारी असते,'

'बरस बरस ! चलच मग' मोहन निश्चयानें ह्मणाला. दोघेही सर्जाच्या घराकडे चालूं लागले व थोड्याच वेळांत घराच्या मागच्या दरवाजाजवळ

जाऊन पोहोचले. दार नुसतें लोटलेलें होतें व आंतल्या बाजूस एका चंद्रमौळी खोलींत सर्जाची म्हातारी आई घोंगडें टाकून पडली होती. हे आंत आलेले पाहतांच तिनें क्षीण स्वरांत ' कोण आहे ' असें विचारलें. त्यावर कोणी नाहीं. आम्ही आहोंत ' असें गुरकत दोघेही सर्जाच्या माडीवर जाणाऱ्या जिन्यावरून पाय न वाजवतां, अगदी वर जाऊन पोंहोचले. खोलींत जाण्याचें दार बंद होतें. दाराला फटी मात्र पुष्कळच होत्या. आंत दिवा जळत होता. मोहनानें विजयी मुद्रेनें फटींतून आंत डोकावून पाहिलें त्याच्या नजरेस जें दृष्य पडलें त्यामुळें तर तो क्षणभर स्तंभित झाला. सर्जा ज्या व्यक्तीबरोबर रंगेल दंगल करीत होता त्या व्यक्तीकडे पाहतांच मोहनालाही भयंकर हांव सुटली. याच क्षणापासुन ' आपल्याला नकळत सर्जानें ही शिकार उडवली. याबद्दल मोहनाच्या पापी हृदयांत डांचण्या सुरू झाल्या. ' आपणही ही शिकार उडवून सर्जाची चांगलीच जिरवली पाहिजे. ' अशा असूयेच्या विचारांनीं त्याच्या डोक्यांत ठाणें दिलें. आतांच आंत जाऊन सर्जाच्या देखत त्या व्यक्तीला पापालिंगन द्यावें असा विचार त्याला सुचला. इतक्यांत आंतून पुढील संभाषण त्याच्या कानीं आलें.

' जाऊंदे बाई आतां मला '

' कांहीं फार नाहीं उशीर झाला. '

' नको. पण जातेंच मी '

हें ऐकून आंतील व्यक्ती जाण्याच्या तयारींत आहे हें पाहून, मोहन व नान्या दोघेही गपचीप जिना उतरून मागच्या दारानें बाहेर पडले. बराच वेळ कोणी कोणाशीं बोललें नाहीं. मोहनच्या अंतःकरणाला जणूं काय चटकाच बसला होता.

' मोहन ' शेवटीं नान्यानें शांतता भंग केला.

' छट बोलूं नकोस ' मोहन खेकसला.

' कां ?'

' तें कांहीं नाहीं. एक दिवस सर्जाच्या देखत मी तिचा हात धरणार. त्याशिवाय त्याची जिरणार नाहीं. माझ्याशीं लपंडाव काय ?'

सर्जा व मोहन या जिवश्चकंठश्च मित्रांत आजच प्रथम वितुष्ट आलें. एकमेकांच्या गळ्यांत गळे घालून पापाचरण करणाऱ्या या दोन मित्रांत

आजच प्रथम फाटाफुटीमुळेंच पुढें भयंकर अनर्थपात कोसळणार होता ! ! या साऱ्या अनर्थपाताचें कारण फक्त एकच, व तें म्हणजे "ती" हें होय ! !

दुसरे दिवशीं म्हणजे शुक्रवारीं सुंदरनें तें पत्र यशवन्ताचें हातीं स्वतःच दिलें. गंगूनें स्वतःचा एक निराळाच व्यूह रचला होता. वसंत वसतिगृहा-कडे जात असतां वाटेतच गंगूनें त्याला गांठलें 'तो कॉलेजांतूनच घरीं म्हणजे आपल्या खोलीकडे चालला होता. गंगूनें त्याच्या मागोमाग जाऊन 'वसंतराव' अशी त्याला हांक मारिली. हांक मारणारी व्यक्ती पुरुष नसून स्त्रीच आहे हें वसंतानें तावडतोब ओळखलें व तो झटकन् मागें वळला. गंगू त्याच्या दृष्टीस पडली. गंगू पवार या नांवाची एक मुलगी आपल्या कॉलेजांत आहे एवढें वसंताला ठाऊक होतें. पण तो तिच्याशीं आजपर्यंत कधीं एक अक्षरही बोलला नव्हता. किंवा त्याला तशी इच्छाही नव्हती. आपण होऊन एकादी विद्यार्थिनी एखाद्या तरुणाची ओळख करून घेईल ही गोष्ट असंभाव्य जरी असली तरी बऱ्याच विद्यार्थ्यांना चमत्कारिक वाट-ल्यावांचून राहात नाहीं. याचें कारण एवढेंच कीं असे प्रकार क्वचितच घडून येतात.

'वसंतराव'

'आं, काय ? मला हांक मारलीत आपण ?'

'हो. थोडं काम आहे.'

'काय बरं ?'

'मी तुमच्या सुंदरची मैत्रिण आहे.'

गंगूचे हे शब्द व विशेषतः 'तुमच्या' हा शब्द ऐकून वसंत गार झाला. गंगू पुढें बोलू लागली, 'हे पहा. तुमच्याबद्दल सुंदरनें मला सगळी हकीगत सांगितली आहे. पण अलीकडे सुंदर जरा चळली आहे.' सुंदर चळली आहे म्हणजे काय हें गूढ वसंताला उलगडेना.

'चळली आहे ?' वसंतानें थट्टेनें विचारलें.

'हो. अलीकडे ती दुसऱ्याच प्रेमांत गुंतली आहे.' अद्यापही वसंताला कांहीं उलगडा झाला नाहीं. ही व्यक्ती वेडीबिडी तर झाली नसेल ना. अशीही शंका त्याच्या मनांत आली. तरी पण त्याचा थट्टेचा स्वर मावळला.

'काय ह्मणता काय तुम्ही?'

'माझं ह्मणणं एवढंच कीं...' एवढे शब्द उच्चारून गंगू थबकली. वसंताचें आश्चर्य दुणावलें. तो कळवळ्यानें ह्मणाला 'काय तें सांगा ना!' आपल्या सावजावर योग्य तो परिणाम झाला हें उनाड गंगूच्या ध्यानांत आलें. तिचें अपवित्र अंतःकरण समाधानांत डुंबूं लागलें.

'पण कदाचित तुह्मांला खोटं वाटेल.'

'अहो, पण काय ते सांगा कीं आधीं.'

'वसंतराव सुंदर आलिकडे त्या यशवन्तराव देशमुखांच्या—' गंगू पुन्हां थबकली. या तिच्या थबकण्यानें वसंताचें हृदय पाण्याबाहेर काढलेल्या माशासारखें तळमळूं लागलें. तो बावरला. तो संतापला.

'बोला काय तें लवकर.'

'पण तुम्ही मलाच तर नाहींना खोटी ठरविणार' गंगू खरें काय आहे तें सांगण्यांत अद्याप लटपट करीत आहे हें पाहून आतां मात्र संतापातिरेकानें त्यानें दांत घट्ट आंवळून धरले. तो तिच्याकडे क्रूर दृष्टीनें पाहूं लागला. आतां अधिक ताणल्यास सारा घोटाळा होईल हें लबाड गंगूच्या ध्यानांत आलें. लागलीच तिनें 'वसंतराव! सुंदर त्या देशमुखांच्या नादीं लागली आहे.' हें शब्द उच्चारून, पोलक्याच्या खिशातलें पत्र वसंताच्या कांपऱ्या हातांत दिलें. तो विषारी बाण वसंताच्या हृदयाला भेदून गेला. त्याचें काळीज फाटून गेलें. वाटलें कीं सारी दुनिया दुभंग होत आहे. वाटलें कीं आभाळ फाटून त्यांतून अग्नीचा पाऊस कोसळत आहे. त्याचे हातपाय अक्षरशः लटपटूं लागले. महत्प्रयासानें त्यानें स्वतःस सांवरण्याचा प्रयत्न केला. त्याची दृष्टी त्या पत्रावर खिळून गेली. संतापानें लाल झालेले त्याचे डोळे निवळूं लागून निमिषार्धांत त्यांतून अश्रूंचा पाऊस पडूं लागला. वसंत, कॉलेजांत शिकणारा, एक कोमल अंतःकरणाचा भाग्यशाली तरुण रडूं लागला. त्याला अश्रू आंवरतांच येईनात. त्या पत्राकडे दृष्टी रोखूनच ती करुण मूर्ती मागें वळली. कांहीं अश्रू जमिनीवर, कांहीं कोटावर व कांहीं त्या पत्रावर पडत होते. तो धडपडत आपल्या खोलींत गेला. आंत जातांच थरथरणाऱ्या हातानें त्यानें डोक्यावरची

टोपी कुणीकडे तरी फेंकून दिली. मोठ्या कष्टानें त्यानें आपलें जड शरीर खुर्चीत लोटून दिलें, त्याच्या हातांतलें पत्र मात्र पडलें नव्हतें किंवा त्यावर वेधलेली त्याची दृष्टीहि ढळली नव्हती.

त्या पत्रांत त्याला काय दिसलें ? त्या पत्रांत त्याला असें दिसलें कीं त्याची सुंदर, त्याच्या आजपर्यंतच्या जिवलग मित्राच्या गळ्यांत गळा घालून डौलानें हिंडत आहे. त्याला असें दिसलें कीं सुंदरची मैत्रीण विमल स्वतःच्या हातानें स्वतःचें पवित्र कुंकू फरफाडून टाकत आहे. त्याला असें दिसलें कीं यशवंत आपणाकडे पाहून तुच्छतेनें हंसत आहे. त्याला असें दिसलें कीं सुंदरही त्याच्याकडे बघून त्याच्या आंगावर थुंकण्या-साठीं तयार झाली आहे. त्या पानांत त्याला वसंतही दिसूं लागला. त्या पत्रांतील वसंत इतका दीन दिसत होता कीं वसंताला त्याची करुणा आली.

'काय करूं तरी काय ?' वसंताचें मस्तक सुन्न होऊन गेलें. 'माझी सुंदर. पण आतां ती माझी कसली ? यशवंत, निर्दया, कसाबा, माझ्या मैत्रीचे उपकार चांगलें फेडलेस, इतके दिवस मैत्रीच्या प्रेमाचें अवडंबर माजवून शेवटीं तूं माझा चांगलाच गळा कापलास. मी ब्राह्मण, म्हणून तर तुम्ही माझी अशी हेटाळणी केली नाहींत ना ? सुंदर ब्राह्मणेतर म्हणून तर तिनें माझी अशी फसवणूक केली नसेल ना ? आतां मी काय करूं ? मी आत्महत्या करूं कां ? जहर विषाची पूड खाऊन या जगाचा शेवटचा निरोप घेऊं कां ?......कां म्हणून ? जिवंत राहूनच...सुंदर...चांडाळणी..... सुंदर ! माझी अशी फसवणूक केलीस ना ? तुला जर माझी फसवणूक करा-वयाची होती तर मला वेड्या प्रेमाच्या नादीं तरी कां लावलेंस ?...अरेरे प्रेमी जीव ! कसलें प्रेम ? प्रेम...पाप...पाप...अत्यंत नीच कोटींतलें पाप !

वसंताचें मन भडकलें होतें. त्याची विचारशक्ती धुंद झाली होती. त्याचें अंतःकरण वेडावलें होतें आणि अशा वेड्या हृदयांत नानातऱ्हेच्या शक्य अशक्य शंकाकुशंका थैमान करूं लागल्यास त्यांत नवल तें काय ? त्याच खुर्चीत, त्याच स्थितींत, तसलेंच विचार करीत तो सायंकाळपर्यंत बसला. त्यावेळीं मात्र दारावर कोणी तरी थाप मारलेली ऐकून तो आपल्या जहरी विचारांच्या तंद्रींतून जागा झाला. खुर्चीवर बसल्या बसल्याच त्यानें विचारलें 'कोण आहे ?'

' मी यशवंत, दार उघड.'

यशवन्ताचे दाराबाहेरून आलेले हे शब्द कानीं पडतांच वसंताला विजेचा धक्का बसल्यासारखें झालें. तो खाडकन उठला व घट्ट मुठी आंवळून दाराकडे बघूं लागला.

' वसंत, दार उघड ना ?'

' कोण ?'

' अरे कोण काय, मी आहे.'

' पाजी मनुष्या !'

बाहेर यशवन्त मोठ्यानें हांसला.

' हांस, हांस, मैत्रीचा खेळ पुरे झाला.'

बाहेर उभ्या राहिलेल्या यशवन्ताला हा सारा प्रकार मौजेचा वाटला. त्याला वाटलें कीं वसंत कांहीं तरी गम्मत करीत आहे.

' पुरे, पुरे, दार उघड.'

' चालता हो म्हणून सांगितलें ना !'

' पुरे रे !'

' जा ! तिच्या गळयांत मिठी घालून बैस.'

यशवन्तावर वज्राघात झाला ! वसंत खास वेडा झाला असें त्याला वाटलें. ही 'ती' कोण याचा त्याला मागमूसही कळेना. वसंताचें मन एकाएकी आपल्याबद्दल कलुषित झालें आहे हें त्याला कळून चुकलें. यशवन्त दाराबाहेरच उभा राहिला. त्याची मुद्रा काळवंडली. बऱ्याच वेळानें खिन्न अंतःकरणानें परत गेला. ' हें झालें तरी काय ?' याची त्याला कल्पनाच येईना. ' कांहीं तरी झालें आहे खास ' एवढें मात्र त्याला पूर्णपणें समजलें.

गंगूच्या हातांत सांपडलेल्या त्या निर्जीव पत्रानेंच हा सारा घोटाळा उत्पन्न केला. असें त्या पत्रांत होतें तरी काय ! दोन जिवलग मित्रांत व एका प्रेमी जोडप्यांत वितुष्ट आणण्यास कारणीभूत होणाऱ्या त्या पत्रांत एवढी जबर जादू तरी कसली होती ?

---

## प्रकरण १७ वें.

# " दुर्दैव ! दुसरें काय ?"



यशवंत खिन्न अंतःकरणानें एकटाच बाहेर पडला. थोड्याच वेळांत रोजच्या कार्यक्रमाप्रमाणें तो गुत्त्याजवळ जाऊन उभा राहिला. तरीपण आज त्याला उत्साह वाटेना. अलिकडे त्याच्याबरोबर वसंतही येत असे. पण आज तो नव्हता. थोड्याच वेळांत आणखी एक प्रकार घडून आला. व त्यामुळें तर त्याची खिन्नता अधिकच वाढली. आठवड्यांतून दोन दिवस तो रात्रीं महारवाड्यांत जाऊन तो तेथें शिकवीत असे हें वाचकांना आठवत असेलच. तेथेंच केन्याची आई अंबू महारीण रहात होती. यशवंतानें तिच्याशीं गोड बोलून ' मी पुन्हां दारू पिणार नाहीं. ' अशी शपथ घेवविली होती. यशवंत उभा होता. इतक्यांत खाकेंत खराटा घेऊन अंबू गुत्त्याजवळ आलेली त्यानें पाहिली. अंबू शपथ विसरली कीं काय असा यशवंताला संशय आला व दुर्दैवानें तो अखेर खरा ठरला. अंबूनें यशवंताला पाहिलें. पण बळेंच दुर्लक्ष करून ती गुत्त्याचा उंबरठा ओलांडूं लागली. यशवंतानें तेवढ्यांत तिला ' अंबूताई ' अशी हांक मारिली. ती थबकली.

' अंबूताई, शपथ विसरलांत ?'

' मास्तुरसाब अश्शी आज थवाडी घेऊन्द्या बघा. डवा्कं कसं चढल्या.

' पण—'

' थांबा वाइच ' असें म्हणून अंबूनें आंत जाऊन ताडीची बाटली तोंडाला लावली. यशवंताचें अंतःकरण होरपळून गेलें. आपल्या विनंतीचा शेंवटी असाच परिणाम झालेला पाहून त्याला वाईट वाटलें यांत काय आश्चर्य ? आपण अंगिकारलेलें समाज-कार्य किती कठीण आहे हें त्याला कळून चुकलें. त्याला तेथें उभें राहवेना. तो परत फिरला. दहा पंधरा पावलें चालून गेला असेल नसेल तोंच त्याचें अंतःकरण खिन्न होण्यास मदत करणारी आणखी एक गोष्ट घडून आली.

'अहो देशभक्त' कोणीतरी त्याच्या खांद्यावर हात ठेवून त्याला म्हटलें यशवंतानें मार्गे वळून पाहिलें.

'अहो देशभक्त' असा खोंचक टोमणा मारणारी ती व्यक्ती मोहनाची होती कर्मधर्मसंयोगानें यशवंताला अंबू महारणीशीं बोलतांना मोहनानें पाहिलें होतें.

'कोण मोहन ?'

'अरे वाः देशभक्त !'

'कां बुवा, ही कां आम्हांला पदवी !'

'इथें गुत्याजवळ येऊन देशभक्तीच करतां ना !'

'मोहन ! उगाच कां माझी थट्टा करतोस !'

'उगीच ! आणि तुझी थट्टा !! भले, तुम्हीं केवढे मोठे. अंबू महारणीशीं संगनमत करणारे तुम्हीं—'

'काय !'

'कांहीं नाहीं. दिनबापाच्या पोरांना महारणीच—'

यशवंताला फाडकन् मोहनाच्या गालफडांत फडकवावीसें वाटलें. पण त्याचा निश्चय ढळला नाहीं. तो निमूटपणें चालू लागला. खरी गोष्ट मोहनाला समजावून सांगणें—पालथ्या घागरीवर पाणी ओतण्यासारखें होतें. त्यापेक्षां कांहींच न बोलणें यशवंताला फार बरें वाटलें. पण मोहनाचे शब्द मात्र त्याला दुखावल्यावांचून राहिले नाहींत. आपण साध्या गोष्टी केवळ लोककल्याणाकरतां करतों त्याचा लोक कित्येकवेळां कसा नीच अर्थ काढतात हें पाहून त्याच्या अगोदरच खिन्न झालेल्या हृदयाला आणखी डागण्या बसल्या !

खऱ्या सत्यशोधकाला, लोककल्याणाच्या पवित्र हेतूनें जनसेवा करीत असतां याहून केवढालीं क्रूर संकटें सोसावीं लागतात. लोकमान्य किंवा महात्माजी अशांसारख्या अत्यंत उच्च कोटींतल्या, लोकोत्तर, खऱ्या सत्यशोधकांना, कारागृहवासच नव्हे तर जननिन्देसारखीं भयंकर संकटें सोसावीं लागलीं नाहींत काय ! लोकसेवेचें व्रत असें जाज्वल्य आहे. देशभक्तीचें व्रत असें कठीण आहे. जे कर्मवीर लोक कल्याणा साठीं झटत आहेत,

त्यांना हाल अपेष्टादि संकटें सोसण्यास तयार असावेंच लागतें. "देशभक्त" ही पदवी अशी फुकाची नाहीं कीं, जी सहज—चहा पितां पितां किंवा सिगारेटचे झुरके देतां देतां अनायासें मिळू शकेल ! 'सत्यशोधक' ही पदवी अशी नाहीं कीं जी भटांच्या पोरींवर अत्याचार करतां सहज मिळूं शकेल ! या पदव्या मिळविण्यास तशीच थोर लायकी लागते. यशवंत दुःखानें टेंकडीच्या बाजूस वळला. परन्तु त्यानें ठरविलेला देशसेवेचा त्याचा निश्चय मात्र यत्किंचितही ढळला नाहीं.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं म्हणजे रविवारीं सुंदरच्या पत्राप्रमाणें तिच्या खोलीकडे जाण्यास निघाला. त्या ठिकाणीं तरी वसंत येईल व काय भानगड झाली आहे त्याचा खास उलगडा होईल अशी त्याची कल्पना होती.

यशवंत सुंदरच्या खोलींत शिरला व तिनेंही त्याचें हंसत हंसत स्वागत केलें. हें मुलींच्या वसतिगृहासमोरील उभ्या असलेल्या एका व्यक्तीनें पाहिलें. ही व्यक्ती म्हणजे वसंतच होता. या उप्पर यशवंत व सुंदर आपल्याला मेलीं असें अशा रीतीनेंच वागण्याचें त्यानें ठरविलें होतें खरें पण त्याचें मन त्याला स्वस्थ बसूं देईना. खरोखरच यशवंत सुंदरकडे जातो कीं काय हें आपण पहावें असें म्हणून तो पत्रांत लिहिलेल्या वेळीं त्या झाडाखालीं येऊन उभा राहिला होता. यशवंताचें सुंदरनें केलेलें स्वागत पाहून वसंत अधिकच भडकला. 'खोजात......' असें कांहींसें पुटपुटत स्वारी खोलीकडे गेली. सुंदरला पार विसरून जावयाचें असा त्यानें विचार केला होता खरा पण तसें जमणें कठीण होतें. कांहींतरी करून सुंदरच्या खोलींत जाऊन तिची निर्भत्सना करावी, असें त्याच्या मनानें घेतलें. काय मनुष्य–स्वभाव चमत्कारिक आहे पहा ! सुंदर आपल्याला मेली असें समजणाऱ्यालाच तिच्या खोलींत जाऊन खूप खूप सडकून बोलावें असेंही वाटावें ना ! यांतली खरी गम्मत अशी होती कीं वसंताला सुंदरची रम्य मूर्ति एकदां तरी बघावी असें अंतर्यामीं वाटत होतें. 'तिचें आतां कधींहि तोंड पहावयाचें नाहीं' असें निश्चित केलेल्या वसंतालाच, अंतर्यामीं, एकदां तरी सुंदरशीं शेवटचे दोन शब्द बोलावेत असें फार फार वाटत होते. पण सुंदरकडे आपण जावें कसें ? याला युक्ती काय काढावी ?

वसंताला आठवलें कीं सुंदरचें छायाचित्र तिनें आपण होऊन याचेजवळ याला सप्रेम नजर म्हणून दिलें होतें. त्यानें तें बाहेर काढलें. तो सुंदरचा बस्ट होता. त्यांत सुंदर पाणिदार व प्रेम पूर्ण नयनांनीं याच्याकडे पाहात होती. छायाचित्रांतल्या त्या रम्य तरुणीकडे पाहून वसंत 'निमकहराम माझ्याशीं बेईमान' असें त्वेषानें उद्गारला. तो बराच वेळ त्या मूर्तीकडे पाहात बसला. पुढें पुढें राग निमाला, व अंतःकरणांत पूर्णपणें रसरसणारा अनुराग जागृत झाला. डोळे ओले झाले व 'सुंदर ! या वसंताला तूं विसरलीस कां ?' असें अंतःकरण पिळवटून निघालेले करुण शब्द त्याच्या ओंठाबाहेर पडले. ते शब्द त्यानें ऐकले. स्वतःकडेच तुच्छतेनें पाहात तो हंसला. 'हा तिच्या अंगावर फेंकून तिचा कायमचा संबंध सोडून देतों.' असें पुटपुटून. ही स्वारी खोलीबाहेर पडली.

यशवंत सुंदरच्या खोलींत गेला तेव्हां विमल अगोदरचतेथें येऊन बसली होती. वसंत तेथें न दिसल्यामुळें, यशवंतानें वसंत नाहीं वाटतं आला' असें विचारलें 'नाहीं आले. मीच त्यांना बोलावून घेऊन येते.' असें सुंदरनें उत्तर दिलें. सुंदरचा डाव असा होता कीं, यशवंताला खोलींत विमलेबरोबर एकटेंच सोडून आपण स्वतः वसंताला बोलावण्यासाठीं म्हणून त्याचेकडे जाऊन, थोडा वेळ तेथें बसून, मग त्याचेबरोबर परत यावें. म्हणजे अनायासेंच विमल–यशवंताला परस्परांशीं प्रेमी–संभाषण करून अंतःकरणें खुलीं करतां येतील.

'मग मीच आणतो त्याला बोलावून ?

'छेः छेः ! त्यांना बोलवायला मीच गेलं पाहिजे.

सुंदरनें असें निक्षून सांगतल्यावर यशवंत तरी काय बोलणार ! शिवाय समोरच्या खुर्चीवर बसलेली मूर्ती बघून त्या खोलींत बसणें नाकबूल करणें त्याला अशक्य होतें.

'बसा, आणतेंच मी त्यांना बोलावून' असें म्हणून सुंदर लगबगीनें बाहेर पडली. ती थेट वसंताच्या खोलीकडे गेली. वसंत त्यावेळीं नुकताच बाहेर निघाला होता. सुंदरला पहातांच तो थांबला व क्रुद्ध नजरेनें तिच्याकडे पाहात आपल्या खोलींत शिरला. सुंदरही त्याच्या मागोमाग आंत गेली. सुंदर या पूर्वीं एक दोन वेळां मुलांच्या वसति–गृहांत आलेली होती.

'वसंतराव, आज एक गंमत आहे हं' खोलींत जातांच सुंदर उद्गारली. तिला कल्पनाही नव्हती कीं, वसंत संतापानें वेडावला आहे. तिला कल्पनाहि नव्हती कीं, वसंत एका पतित तरुणीनें—असूयेच्या भरांत टाकलेल्या जाळ्यांत गुरफटून गेला आहे !

'आतां झाली एवढी गंमत बस्स नाहीं कां झाली !' हातांतलें सुंदरचें छायाचित्र खुर्चीच्या पाठीवर आपटत आपटत वसंत तिरस्कारानें म्हणाला.

सुंदरला या वाक्याचा कांहींच अर्थ कळला नाहीं. ती चकित होऊन म्हणाली, 'कसली गंमत ?'

'तूं म्हणतेस तीच.'

'म्हणजे, तुम्हांला कळली कशी ती ?' सुंदरला वाटलें कीं, यशवंत—विमलेला गुज-गोष्टी करण्यास कसें मोकळें सोडून दिलें ही बातमी वसंताला समजली व म्हणूनच तो असें बोलत आहे. पण त्यांत रागावण्यासारखें काय आहे याचा तिला उलगडा कसा व्हावा ?

'सुंदर, मला सगळं कांहीं कळलं आहे.'

'असयाहि, तें कसं?' सुंदरनें थोडें हंसत विचारलें.

'कसं अन् काय, कळलं खरं.' वसंतराव गुरकतच उद्गारले.

'मग, कशी केली मी मौज?' सुंदरनें कुतुहलानें विचारलें. सुंदरला वाटत होतें कीं, आपण यशवंत—विमलेच्या घडवून आणलेल्या भेटीची माहिती याला कळली. वसंताला वाटत होतें कीं, ही महामाया यशवंताच्या नादीं लागली असून आपल्याला अधिकच चिडविण्यासाठीं इकडे आली आहे.

'वा: छानच केली मौज ! सुंदर हें तुझें छायाचित्र परत घेऊन जा, मला त्याची आतां गरज नाहीं. आणि यापुढें तुला भेटण्याचीही माझी मुळींच इच्छा नाहीं.'

सुंदरच्या वक्षःस्थलांत कोणीतरी तीक्ष्ण धारेचें हत्यार खुपसलें. कोणीतरी तिला उचलून शिशाच्या रसरसणाऱ्या लालभडक रसांत फेंकून दिलें. कोणीतरी तिला महासागराच्या उदरांत थयथयाट करणाऱ्या हिंस्र प्राण्याच्या दाढेंत ढकलून दिलें. कोणीतरी तिला सात दिवस उपाशी असलेल्या व भुकेनें तळमळणाऱ्या क्रूर व्याघ्राच्या जबड्यांत नेऊन टाकलें. सुंदर बेभान होऊन खालीं पडूं लागली, वसंताच्या हृदयांतलें खरें प्रेम जागृत झालें.

त्यानें तिला सांवरून धरून खुर्चीवर बसविलें. तिनें डोळे मिटून घेतले. थोडा वेळ तिच्या डोळ्यासमोर अंधार माजून गेला. याच वेळीं 'आपणाला त्या गंगू पवारनें खोटेंच पत्र देऊन तर फसवलें नसेल ना' असा एक प्रश्न वसंताच्या मस्तकांत आला पण त्याच्या दुर्दैवानें तो फार वेळ टिकला नाहीं त्याला सुंदर हें सारें ढोंग करीत आहेसें भासूं लागलें व आतां हिच्यासमोर उभें राहण्यांत हंशील नाहीं हें ओळखून तो स्वतःच खोलींतून बाहेर पडला.

सुंदरनें डोळे उघडून सभोंवार पाहिलें. जमिनीवर पडलेल्या तिच्या छाया चित्राशिवाय तिला कोणीच दिसलें नाहीं. 'वसंतराव' रडक्या स्वरांत तिनें अस्पष्ट हांक मारली. पण तिला 'ओ' देणार कोण! भोंवतालच्या इतर विद्यार्थ्यांच्या खोल्यांतून बराच आरडाओरडा चालला होता. तेवढा मात्र तिच्या कानीं पडला. ती थोडा वेळ तिथेंच रडत बसली. शेवटीं अतीशय कष्टानें तिनें आपलें शरीर उचललें व ती स्वतःच्या खोलीकडे अत्यंत निराशेनें, अत्यंत दुःखानें, निघाली. आपण आपल्या मैत्रिणीला मदत केल्या-बद्दल कांहीं वेळां पूर्वीचा तिला वाटणारा साभिमान आनंद आतां कुणि-कडेच मावळला होता तथापि या प्रकारची यशवंतासारख्या तिला जरा तिऱ्हाईतच असलेल्या इसमाजवळ वाच्यता करावयाची नाहीं, फक्त ही गोष्ट एकट्या विमलेलाच कळवावयाची असें तिनें मनाशीं ठरविलें.

सुंदर एकटीच वसंताला न घेतां परत आलेली पाहून, यशवंतानें 'काय नाहींं आला कां?' असें तिला विचारलें वसंत आला नाहीं व आतां काल-च्या प्रकारचा उलगडाही होणें कठीण याची त्याला पुरी कल्पना आली.

'काय, नव्हते वाटतं वसंतराव खोलींत?' विमलेनें स्मित मुद्रेनें विचारलें. यशवंत व विमल यांची मुद्रा फुललेली दिसत होती. परस्परांज-वळ हृदयाच्या अगदीं खोलांतल्या भागांत दडून बसलेलें प्रेम दोघांनींहि व्यक्त केल्यामुळें त्यांना सहाजिकच समाधान वाटत होतें. पण सुंदर! तिचें मात्र दुर्दैव ओढवलें हें मात्र खरें. आपल्या मुद्रेवरून आपलें अंतःकरण शतशः विदीर्ण करणारें जहरी दुःख कुणाला कळूं नये यासाठीं सुंदर फार धडपड करीत होती. व त्यांत तिला थोडें फार यशही मिळालें. यशवंत, विमलला कांहीं कळलें नाहीं हें खरें. कदाचित् सुंदरच्या खिन्न मुद्रेकडे लक्ष देण्यास त्याचें चित्तहि ठिकाणावर नसेल.

‘ कुठं बाहेर गेले आहेत वाटतं ’ सुंदरनें बळेंच स्मित करीत हे शब्द उच्चारले, व तिनें स्टो पेटवला.

‘ सुंदर, तूं बैस, मीच करते ’

‘ छेः छेः ! तुला नाहीं तें जमणार ’

‘ नाहीं जमणार ? त्यांत काय आहे !’

‘ कांहीं नाहीं, तरी पण—’

‘ काय ? ’

‘ अग आज तूं माझी गेस्ट आहेस हें विसरलीस वाटतं. कांहो यशवंतराव, गेस्टनें स्वस्थ बसलें पाहिजे ना हो ? ’

सुंदरचें हें भाषण ऐकून त्या दोघी मैत्रिणींच्या प्रेमळ स्वभावाची कल्पना येऊन यशवंत फक्त कौतुकानें हंसला, थोड्याच वेळांत चहा झाला, चहापान झालें, व ‘ वसंत आला असता तर ज्यास्त मौज आली असती ’ असें कांहींसें म्हणत यशवंतानें दोघींचा निरोप घेतला. तो गेला त्याक्षणींच दार घट्ट लावून सुन्दरनें आपल्या जीवलग मैत्रिणीला एकदम मिठी मारली व ती रडूं लागली. विमल हें पाहून फार चकित झाली.

‘ हें काय सुन्दर रडतेस कां ? काय झालं एकाएकीं ! ’

‘ विमल ! ’

‘ काय ? ’

‘ माझं दुर्दैव, दुसरं काय ! ’ सुन्दरनें कळवळ्यानें हे शब्द उच्चारले.

---

## प्रकरण १८ वें.

---

# संशय-कल्लोळ

---

‘ माझं दुर्दैव दुसरं काय ? ’ असें सुन्दरनें कळवळ्यानें उद्गार काढले. होय, तिचें दुर्दैवच उभें राहिलें यांत शंका नाहीं. नाहींतर एका पत्रावर विश्वास ठेऊन, खऱ्या प्रकाराचा स्पष्ट उलगडा न करतां तिचा प्रियकर असा एकाएकीं भडकला नसता. सुन्दर जात्या धीट होती तरी पण जिवलगाच्या कोपाचा विषारी बाण तिला असह्य होत होता.

' सुन्दर कसलं दुर्दैव ! '

' विमे, यशवंतराव माझ्यावर संतापले आहेत. '

' ते कां ! '

' तेंच तर मला समजत नाहीं. ' सुन्दरनें रडत रडत उत्तर दिलें. इतर वेळीं असले चमत्कारिक उत्तर ऐकून विमलनें आपल्या मैत्रिणीची थट्टा केली असती. पण आज तिच्या डोळ्यांतून झिरपणारे अश्रू पाहून विमलेला अतीशय वाईट वाटलें.

सुन्दर व वसंत यांचा गैरसमज दिवसेंदिवस वळावत चालला. दोघे एक-मेकांची भेटच काय पण परस्परांशी शब्दही बोलेनासे झाले. यशवंत व वसंत यांच्या मैत्रीचीही तशीच स्थिती झाली. दारूच्या गुत्यांकडे किंवा महारवाड्यांत यशवंताला त्याच्या कार्यांत मदत करण्यास वसंत पूर्वीप्रमाणें जाण्याचें मुद्दाम टाळू लागला. दोघांची भेट झालीच तर ' कसं काय ' ' ठीक आहे ना ! ' असले निरर्थक मामुली प्रश्नही तो विचारीनासा झाला. वसंत स्वतःखेरीज कुणाचीच परवा करीना. जगांतील आई, बाप, मित्र, मैत्रीण इत्यादी नातीं म्हणजे त्याला थट्टेचीं व तिरस्काराचीं वाटूं लागलीं. तो घरी पत्र पाठविनासा झाला. परीक्षा जवळ येत होती पण वसंताचें पुस्त-कांत लक्ष लागेना. कधीं काळीं पुस्तक हातांत घेतलेंच तर एक दोन मिनि-टांतच तो तें दूर भिरकावून देई. दिवसांतून निदान २५ वेळां तरी तो तें गंगूनें दिलेलें पत्र वाचून निराशेचे व संतापाचे सुस्कारे टाकी.

तें पत्र म्हणजे सुंदरनें यशवंताला स्वतःच्या खोलींत चहाला बोलाव-ल्याचें पत्र होतें. पण हेंच साधें पत्र गंगू पवारसारख्या कपटी स्त्रीच्या हातीं सांपडून त्यानें केवढा अनर्थपात केला होता ! पत्रांतील मजकूर अगदीं साधा होता.

" यशवंतराव यांसी,

उद्यां सकाळीं माझ्या खोलींत आपण जरूर जरूर येण्याचें करावें. कांहीं खाजगी कामही आहे. येण्यास अगदीं चुकूं नये.

आपली,

सुंदर पाटणकर.

पण पिशाचाच्या हातांत असलें कोलीत जातांच त्यानें केवढी आग पेटवून दिली होती. वसंत हें पत्र वारंवार वाची. या पत्रांतील साध्या शब्दांचा त्याच्या मनाला निराळाच वाटे. या पत्रांत त्याला यशवंत-इंदरच्या पातकी लीलांचें भेसूर चित्र दिसत होतें. मनुष्याचा दृष्टि-कोन बदलला कीं त्याला भलभलत्या कल्पना इटकून सुचावयाच्याच! तशीच वसंताची स्थिती झाली होती.

एक दिवस कॉलेज सुटल्यानंतर वसंत वसति-गृहाकडे परत येत होता तेवढ्यांत त्याला यशवंतानें हाक मारिली.

'वसंत जरा......'

'आपल्याशीं बोलण्याची माझी इच्छा नाहीं' असें वसंतानें तिरस्कारानें उच्चारलेले शब्द यशवंताला ऐकावे लागले. यशवंताला, दुसरें दिवशीं सुट्टी असल्यामुळें विलासपुरापासून आठ कोसावर असलेल्या एका खेड्यांत जावयाचें होतें व त्या साठींच 'तूं बरोबर येतोस कां?' असें वसंताला विचारण्याचा त्याचा मानस होता. वसंताचें तुसडें उत्तर ऐकून यशवंताला कसेंसेंच वाटलें. आपल्या मैत्रींत वितुष्ट येण्यास एवढें कारण तरी काय झालें हें त्याला समजेना, व वसंतही स्पष्टपणें उलगडा करीना. यशवंत काय वाटेल तें झालें तरी आपला ठराविक कार्यक्रम चुकवीत नसे. तो एकटाच दुसरें दिवशीं त्या खेड्यांत गेला. खेड्यांत गेल्यावर एका इसमाकडून त्यानें गांवांत अमक्या अमक्याचें आज व्याख्यान आहे तेव्हां सगळ्यांनीं रात्रीं माळावर जमावें अशी दवंडी पिटवली. शहरांतल्या लोकांना व्याख्यान म्हणजे कांहींच वाटत नाहीं, पण खेड्यांतल्या लोकांना हा प्रकार अगदींच नवा होता. रात्रीं माळावर लहान थोर स्त्री-पुरुष मंडळींचा बराच जमाव जमला. खेड्यांतले जवळ जवळ सर्वच लोक जमा झाले होते. या खेड्यांत असा प्रसंग पूर्वी फक्त एकदांच आला होता. कांही गुंडांनीं— याच ठिकाणीं एक तमाशा केला होता व त्यांत ब्राह्मणांची 'भट्या' 'भटुरग्या' इत्यादि शब्दांनीं व कित्येक अचकट विचकट लावण्यांनीं यथेच्छ निंदा केली होती. आणि सगळ्यांत आश्चर्याची गोष्ट ही कीं हे गुंड लोक स्वतःस खरे सत्यशोधक म्हणवीत असत! त्यांना वाटे कीं, सत्यशोधक

म्हणजे तमाशे करून बामणांची छी थूः करणें होय ! ' सत्यशोधक ' या शब्दाचा अर्थ हे गुंड असा विपरीत करीत. या तमाशाचा परिणामही त्या खेड्यांत थोडाफार झाला होता व ब्राह्मणांत व ब्राह्मणेतरांस असलेला सलोख्या किंचित डळमळीत झाला !

वारे वीर ! वारे सत्यशोधक ! वाहवा रे समाजसेवक ! ब्राह्मण–ब्राह्मणेतरांत निष्कारण लाथाळी उत्पन्न करून, समाजाची छकलें उडविण्याचा प्रयत्न करणें हाच का ' सत्यशोधक ' या शब्दाचा अर्थ ? सुदैवानें अगर दुर्दैवानें एकादा ब्राह्मण सुशिक्षित असला तर त्याची हेटाळणी करून त्याच्या आयाबहिणींची विटंबना करणें हाच कां सत्यशोधकीपणा ? हीच कां सत्यशोधकी नीतिमत्ता ? ' ब्राह्मण समाजाचा संपूर्ण नाश करून ब्राह्मणेतरांची प्रगति होणार ' असली खुळचट व पोंचट विचारें खऱ्या सत्यशोधकाला कशी पटतील ?

तथापि यशवंताच्या व्याख्यानासाठीं सारा गांव माळावर जमा झाला हें कांहीं खोटें नाहीं. यशवंतानें अगदीं थोडक्यांत व लोकांना कंटाळा येणार नाहीं अशा सुलभ रीतीनें ' हल्लीं आपणांवर राज्य कोण करीत आहे ? ' ' ते आपणांस स्वराज्य कां देत नाहींत ? ' स्वदेशी म्हणजे काय ? ' इत्यादि विषयांची माहिती जमलेल्या मंडळींना दिली. त्या खेड्यांतल्या लोकांना राजकारण म्हणजे काय किंवा स्वराज्य म्हणजे काय याची मुळींच कल्पना नव्हती. आणि खरोखरच पाहिलें असतां आज कांग्रेसमध्यें नेहरू रिपोर्टाची स्वराज्याची योजना जरी पास झाली असली तरी खेड्यापाड्यांतल्या अज्ञ जनतेला अजून राजकारणाचा यत्किंचितही गंध नाहीं असें आढळून येईल. शहरांतल्या लोकांना वारंवार व्याख्यानें ऐकावयास मिळतात, त्यांना नाना वर्तमानपत्रें वाचावयास मिळतात, त्यामुळें साहाजिकच अधुनिक राजकीय वातावरणाची त्यांना बरीच कल्पना असते. परन्तु खेड्यापाड्यांतल्या जनतेंत अद्याप ही जागृति होणें आहे. स्वराज्य मिळवावयाचें असेल तर प्रथम सारीं खेडीपाडीं हालवून सोडलीं पाहिजेत. त्यांना स्वराज्याची कल्पना आणून दिली पाहिजे. हें कार्य खऱ्या सत्यशोधकाचें आहे. हें काम खऱ्या राष्ट्रसेवकाचें आहे. ' बामणांना ' शिव्या देण्यांत धन्यता मानणाऱ्या येऱ्या गबाळाचें हें काम नव्हे.

यशवंत विलासपूरांत परत आला त्यावेळीं त्याचें त्यालाच समाधान वाटत होतें. खेड्यांत दिलेल्या व्याख्यानाचा लोकांच्या मनावर खरा परिणाम झालेला पाहून त्याला समाधान कां वाटणार नाहीं ?

कांहीं दिवस असेंच निघून गेले. यशवंताच्या व वसंताच्या मैत्रींत उत्पन्न झालेला चमत्कारिक घोंटाळा दिवसेंदिवस वाढूं लागला. सुंदर वसंताच्या उत्कट प्रेमांत सुद्धां केवळ संशयकल्लोळानें कहर उडवून दिला. कोणी कोणाशीं स्पष्ट बोलेना. कोणी कोणाजवळ उलगडा करीना ! आणि कुणा-लाच कांहीं कळलें नाहीं. खरें सत्य जेथें झांकून गेलें होतें तेथें उलगडा करणार तरी कोण ? गंगू पवाराच्या कारस्थानामुळें उद्भवलेल्या या संशयक-ल्लोळाच्या दंगलींतच एक दिवस आणखी एक चमत्कारिक प्रसंग घडून आला, व त्यामुळें तर आगींत तेल ओतल्यासारखे झालें.

त्या दिवशीं सुंदर आपल्या खोलींत हातांत अभ्यासाचें पुस्तक घेऊन बसली होती. तिची नजर पुस्तकाच्या पानावर होती. पण त्या पानावर तिला अक्षरें दिसत नव्हती. त्या ठिकाणीं तिला वसंताचा रागानें लाल झालेला चेहरा दिसत होता. अलीकडे अभ्यासासाठीं म्हणून पुस्तक घेतलें कीं तिची स्थिति अशीच होत असे. ती आपल्या तंद्रींत मग्न होती. खोलीचें दार उघडेंच होतें, तेवढ्यांत बाहेरच्या व्हरांड्यांत कुणाचीशी पावलें वाजल्यामुळें तिचें तिकडे लक्ष गेलें. तों काय आश्चर्य ! हिच्याकडे पहात एक क्षणभरच ' वसंत ' दाराबाहेर उभा राहिला. खरोखरच तो वसंत होता. सुंदरच्या खोलीचें दारासमोर येतांच त्याचे पाय अडखळले. त्याची नजर आंत गेली. हें सारें एका क्षणांत घडून आलें. सुंदरला वाटलें कीं स्वारीनें अबोला सोडला. ती एकदम आनंदानें ' या वसंतराव ' असें म्हणत दाराजवळ आली. तेवढ्यांत वसंत पुढें गेला व शेजारच्या खोलींत शिरला. शेजारची खोली गंगूची होती. व तिनेंच वसंताला स्वतःच्या खोलींत मुद्दाम बोलाविलें होते. हेतू हा कीं वसंत आपल्या खोलींत येतांना सुंदरच्या नजरेस पडावा म्हणजे ती चांगलीच खजिल होईल. गंगू पवा-रच्या दुष्ट मनाला सुंदरला हरप्रयत्नानें त्रास देण्यांत आनंद वाटत होता. व त्याला अनुसरूनच ती युक्त्या प्रयुक्त्या करून असले प्रसंग जमवून

आणील होती. तिनें टाकलेल्या जाळयांत बेडा वसंत अधिकाधिक गुरफटून जात होता. वसंत आपल्याकडे न येतां गंगूच्या खोलींत गेला हें पाहून सुंदरला आश्चर्य तर वाटलेंच पण त्याच क्षणीं अगदीं जहरी विषानें माख-लेला एक तीक्ष्ण टोंकाचा बाण तिच्या जिव्हारीं जाऊन भिडला. तिनें आपलें तोंड बिछान्यावरच्या उशींत खुपसलें व ती कळवळून रडूं लागली.

'यावें वसंतराव' गंगू लाडानें म्हणाली.

'कां बोलावलें होतंत मला' वसंत खुर्चीवर बसत गंभीरपणें म्हणाला.

'शेवटीं माझी शंकाच खरी ठरली ना ?'

'हूं' असें म्हणून वसंतानें सुस्कारा टाकला.

'तुमचे यशवंतराव इतके बेइमान—'

'गंगूताई !'

पण वसंतानें उच्चारलेला 'गंगूताई' हा शब्द तिला आवडला नसा-वासें तिच्या मुद्रेवरून स्पष्टपणें दिसून आलें. तिच्या मनांतून त्यानें अधिक सलगीच्या स्वरांत हांक मारावयास पाहिजे होती.

'गंगूताई, त्याचें नांव सुद्धां काढूं नका. खरोखर तुम्ही माझे डोळे उघडले नसतेत तर मी त्या दोघांच्या लफंडाबाला खास बळी पडलों असतों.

'वसंतराव, सुन्दरला आणूं कां बोलावून ?'

'माफ करा. मी असाच निघून जाईन.'

'पण कदाचित तिचा कांहीं दोष—'

वसंत तुच्छतापूर्वक हांसला मात्र ! थोड्या वेळानंतर वसंत गंगूच्या खोलींतून बाहेर पडला. जातांना त्यानें सुन्दरच्या खोलीकडे मुळींच बघितलें नाहीं. वसंत गेलेला पाहतांच सुन्दर धांवत धांवत गंगूच्या खोलींत घुसली गंगूनें हें असें होणार हें पूर्वींच ओळखलें होतें व त्याप्रमाणें तीही मुद्दाम, खोटा रंग पसरवून देण्याची तयारी करीत होती. तिनें आपले केंस मोकळे सोडले होते. तिच्या अंबाड्याबरची वेणी पलंगावर पडलेली होती. 'सुन्दर अशी अचानक आंत आली व म्हणूनच आपण फार गडबडलों' असा नाटकी अविर्भाव करण्यास गंगू चुकली नाहीं. ढळता पदर सांवरून जरा विचकल्यासारखें दाखवून गंगू उद्गारली.

'कोण सुन्दर ! काय घाबरलें मी !'

गंगूची व तिच्या भोंवतालची रंगेल परिस्थिति पाहून तर सुन्दरच्या पवित्र हृदयाला धक्का बसला. तिचें काळीज चर्रर्र झालें.

' ये बैस सुन्दर '

' गंगू ! आतां कोण आलं होतं तुझ्याकडे ? '

' कोण ! हं हं, वसंतराव आले होते. कां ? '

' कां ! मग ते माझ्याकडे कां नाहीं आले ? '

' अगबाई, तुझ्याकडे नाहीं कां आले ते ?

' नाहीं. '

' कां भांडलांत कीं काय दोघं ! ' गंगूनें बळेंच अज्ञानाचें पांघरुण पांघरलें. पण सुंदरचें अज्ञानें समाधान व्हावें कसें ! तिच्या मनांत वसंताच्या वर्तनाबद्दल दूषित संशय डोकावूं लागला होता.

' गंगू तुझें केस मोकळे कां ! अन् ही वेणी ? '

सुंदर एवढे शब्द उच्चारतें न उच्चारतें तोंच गंगू रागानें लाल झाली.

' सुंदर ! चालती हो बघूं '

सुंदरनें हे शब्द ऐकले. तिला मागील एका प्रसंगाची आठवण झाली. त्यावेळीं गंगूनें हिच्याबद्दल शंका घेतांच हिनें गंगूला ' चालती हो ' असें म्हटलें होतें. आज तीच गंगू आपल्याला ' चालती हो ' असें म्हणते हें ऐकून तिला असह्य वेदना होऊं लागल्या. तिच्या मानी मनाला गंगूचें हें फूत्कार भयंकर झोंबूं लागले. ती धडपडत आपल्या खोलीकडे परतली. सुंदरला अशा स्थितींत पहातांच गंगूला स्वर्ग दोन बोटें उरल्यासारखें वाटूं लागलें. मागें एकदां सुंदरनें तिला ' चालती हो ' म्हटलें होतें. आज हिनें सुंदरला ' चालती हो ' म्हटलें. सूडासाठीं तळमळणाऱ्या गंगूच्या अंतःकरणास आतां आनंद-सागरांत डुंबत राहिल्यासारखें वाटूं लागलें ! ! तिला आनंदाच्या उकळ्या फुटूं लागल्या. सुंदरच्या मनांत मात्र वसंताबद्दल नाना प्रकारच्या कुशंका उत्पन्न होऊं लागल्या गंगूनें उच्चारलेले ' चालती हो ' हे शब्द तर तिचें मर्मस्थान भेदून गेलेच पण त्यापेक्षांही वसंताच्या आतांच्या वर्तनाचा तिच्या अजाण मनावर फार परिणाम झाला. एखादें सुकुमार फूल एखाद्या धोंडयाखालीं सांपडून चुरडून जावें

त्याप्रमाणेंच तिची अवस्था झाली. तिला वाटलें कीं वसंतानें आपल्याला फसविलें, वाटलें कीं वसंत गंगूच्या नादीं लागला. वाटलें कीं ओठचा अमृताचा प्याला एकदम कोणीतरी लाथेनें उडवून दिला ! ती धडपडत आपल्या खोलींत गेली. तिचे पाय लटपटत होते. आश्रयासाठीं तिनें खुर्चीच्या पाठीवर हात टेंकले. पण तेवढ्यांच तिच्या डोळ्यांसमोर काळाकुट्ट अंधःकार भीषण थैमान करूं लागला. तिचा तोल गेला, ती धाडकन् जमिनीवर पडली. पडतां पडतां खुर्चीच्या कोंपऱ्यावर तिचें कपाळ आदळलें. तिच्या फुटक्या कपाळांतून रक्त वाहूं लागलें ! ती बराच वेळ तशीच निपचित पडली. शेजारच्या खोलींत गंगू पवार मात्र स्वतःशींच हंसत होती.

---

## प्रकरण १९ वें

## " अंबू महारीण "



संशय–कल्लोळाला दिवसेंदिवस अधिकाधिक रंग चढूं लागला. सुंदर वसंताला विसरण्याचा प्रयत्न करूं लागली. आपल्याजवळ कांहीं एक समक्ष खुलासा न करतां, अगदीं लहानपणापासून वाढीस लागलेल्या प्रेमाचाही तिरस्कार करूं लागणाऱ्या तिच्या प्रियकराचा आतां तिला मनस्वी संताप आला होता. ते आपल्याकडे येत नाहींत व पहिल्यासारखे आपल्याशीं बोलत नाहींत तर आपणहि यापुढें त्यांच्याशीं बोलूं नये असा करारी निश्चय करण्याचा सुंदरनें हळू हळू प्रयत्न चालविला होता. सुंदर वसंताला विसरण्याचा प्रयत्न करूं लागली. वसंत सुंदरची आठवण बुजविण्याचा प्रयत्न करूं लागला. पण हें व्हावें कसें ? अगदीं लहानपणापासून निष्पाप प्रेमानें निगडीत झालेली अंतःकरणें परस्परांस विसरतील कशी ! अभ्यासाचे पुस्तक जरा बाजूला ठेवतांच, सुंदरला विसरण्याचा प्रयत्न करणारा वसंत, तिच्याबद्दल विचार करूं लागे. त्यांतच त्याला समाधान होई. सुंदरचीहि अगदीं अशीच स्थिति होती. भोंवळ येऊन पडतां पडतां सुंदरचें ज्या दिवशीं खुर्चीवर मस्तक

आदळलें, त्या दिवसापासून तिनें टेंकडीवर फिरावयास जाण्याचें बंद केलें. विमलला याबद्दल अत्यंत वाईट वाटल्यावांचून राहिलें नाहीं. त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट एवढीच कीं त्या दिवसापासून स्वतः यशवंतानेंच विमलेबरोबर फिरावयास जाण्याचें कबूल केलें. एरवीं विमलेच्या वडिलांनींहि तिला टेंकडीकडे एकटें जाण्यास परवानगीहि दिली नसती.

मोहन व सर्जा यांच्या जिगरजान मैत्रींतसुद्धां दिवसेंदिवस फाटाफूट पडत चालली. आपल्या नकळत सर्जानें शिकार मारली व त्यांत आपल्याला भागीदार तर नाहींच. पण त्या प्रकाराची बातमीसुद्धां सर्जानें आपणास दिली नाहीं, हें ध्यानांत येतांच कोणत्या तरी उपायानें सर्जाची खोळा आणि फजिती करण्याचा त्यानें विचार केला होता, व तशा संधीची तो वाट पहात होता. अर्थात वरपांगी तो सर्जाशीं नेहमींप्रमाणेंच वागत होता. आपल्या अंतस्थ हेतूचा नान्याशिवाय दुसऱ्या कोणालाही त्यानें अंदाज लागूं दिला नव्हता.

विमल व यशवंत दोघे सायंकाळीं टेंकडीच्या बाजूस फिरावयास जाऊं लागलीं. अशा वेळीं परस्परांस अगदीं मनमोकळें करून बोलावयास सांपडे व त्यामुळें त्यांचा स्नेहभाव त्यांच्या नकळत दिवसेंदिवस अधिकाधिक वृद्धिंगत होऊं लागला. एके दिवशीं टेंकडीच्या उतारावरून उतरतां उतरतां दोघेही नेहमींप्रमाणें परस्परांशीं बोलत होते.

'यशवंतराव ! सुंदरचे वसंतराव तुम्हांला भेटतात कां ?' विमलनें मध्येंच विचारलें.

'हो, भेटतो. पण तो माझ्याशीं अलिकडे बोलेनासा झाला आहे.' यशवंतानें उत्तर दिलें.

'ते अलीकडे असं काय करतात ?'

'तेंच मला कळत नाहीं.'

बराच वेळ दोघेजण मुकाट्यानें चालत होतीं. इतक्यांत सहज चालतां चालतां विमलेचा पाय एकदम घसरला व ती चांगली दहा बारा फूट खालीं घसरत गेली. हें सर्व अचानक घडून आलें. विमल पडली हें पहातांच यशवंताच्या हृदयाला धक्का बसला. त्याच्या काळजांत चर्रर्र झालें. तो धांवतच विमलजवळ गेला. विमलला खरोखर कांहींच लागलें नाहीं.

एकदम घसरल्यामुळें मात्र ती जरा बावरलीशी दिसली. उतारावरच्या एका आडव्या धोंड्याला पाय थडकल्यामुळें ती आपोआप थांबली. यशवंतानें गडबडून जाऊन विमलचा हात स्वतःच्या हातांत घेतला. त्याच्या चेहेऱ्यावर तो गडबडून गेल्याची स्पष्ट चिन्हें दिसत होती. ती त्याची बावरलेली मुद्रा पाहून, विमलेला धन्य झालें.

' यशवंतराव ! माझ्यापेक्षां तुम्हींच बावरलेले दिसतां ' विमल हंसत हंसत म्हणाली.

तिला कांहीं लागलें नाहीं हें कळतांच यशवंताचा जीव खालीं पडला. तिचा हात न सोडतांच तो तिच्यासमोरच बसला. बरें झालें कीं हा सारा प्रकार टेंकडीच्या अगदीं मागील बाजूला झाला. नाहींतर साध्या प्रकारावरच नीच कल्पनांचे मनोरे बांधणाऱ्या तर्कटांना आयतें भक्ष्य मिळालें असतें !

' कांहीं लागलें नाहींना विमल ? '

' छेः ! अगदीं कांहीं नाहीं. '

दोघांचें बसल्या बसल्याच बोलणें सुरू झालें.

' मी तर एकदम घाबरूनच गेलों बुवा. '

' काय घाबरून ? '

' हो. '

' त्या दिवशीं तिघांचौघांच्या अंगावर एकटा तुटून पडणारा इसम, नुसती मी घसरलें म्हणून घाबरेल हें शक्य तरी आहे कां ? ' विमलनें मोठ्या खुबीनें प्रश्न केला.

' विमल, हा सारा तुझा प्रभाव बरं. '

' अगबाई ! किती लबाड आहांत तुम्ही ! '

' विमल, तुझं माझ्यावर प्रेम आहेना ? तें अढळ राहील ना ? '

' यशवंतराव ! ब्रह्मकुळांत जन्म घेणारी स्त्री चंचल नसते बरं. '

' होय, पण तूं उच्च वर्णीय ब्राह्मण-कन्या, आणि माझ्या तर जाती-जन्माचा पत्ताच नाहीं. '

' यशवंतराव ! माझें तुमच्यावर प्रेम आहे. तुमच्या जातीवर नाहीं. '

विमलचे हे धडाडीचे बोल ऐकून तिच्या प्रियकराला, यशवंताला काय वाटलें असेल ते सांगण्याची अवश्यकता नाहीं. थोड्याच वेळानें दोघेही घराकडे निघाले.

विमलेच्या पवित्र प्रेमाच्या जिवंत अनुभवानें यशवंताला प्रत्येक कार्यांत दुप्पट उत्साह वाटूं लागला. खेड्यांतून व्याख्यानें देऊन जागृति उत्पन्न करण्यांत त्याला कल्पनातीत समाधान वाटूं लागलें. जनसेवेचें कार्य त्यानें यथाशक्ति चालविलें होतें व त्यांत त्याला कित्येक चमत्कारिक प्रसंग आडवे आले. पण आंखलेल्या मार्गावरून केवळ संकटांना घाबरून जाऊन, माघार घेणारा तो फुकाचा ब्राह्मण इटर सत्यशोधक नसून, कुठल्याहि संकटांना न जुमानतां देशसेवा करण्यास तयार असलेला तो एक ' खरा सत्यशोधक ' होता. त्याला अलिकडे नवें नवे अनुभव मिळत होते. त्यावरून दरिद्री हिंदुस्थानांत कळकळीनें समाज-सेवा करणाऱ्या तरुणांची किती उणीव आहे हें त्याला पुरतेपणीं कळून चुकलें. एके दिवशीं विलासपूरच्या महारवाड्यांत असाच एक चमत्कारिक प्रसंग घडून आला.

त्या दिवशीं रात्रीं दहाचे सुमारास शाळा बंद करून यशवंत गांवाकडे जाण्यास निघाला. महारवाडा व गांव यांत फारसें अंतर नसून फक्त अर्ध्या एक मैलाचाच निर्जन रस्ता होता. रात्र चांगलीच अंधारी होती, व आकाशांत जमणारे मेघ पावसास सुरवात करण्याच्या तयारींत होते. यशवंताचे हातांत कंदील होताच, पण महारवाडा सोडून थोडी वाट हा चालून गेला असेल नसेल तोंच पावसास सुरवात झाली. जवळ छत्री वगैरे नसल्यामुळें पावसाची पहिली सर थांबेपर्यंत वाटेवरच असलेल्या एका, मरीआईच्या देवळांत थांबण्याचा त्यानें विचार केला. तेवढ्यांत वाऱ्याचा झोत येऊन, त्याच्या हातांतला कंदील एकदम भडकल्यासारखा होऊन क्षणांत विजून गेला. अंधारांतच यशवंत त्या पडक्या देवळांत शिरला. बाहेर मेघांचा गडगडाट चालू होता. आंत गेल्यावरोबर यशवंतानें खिशांतून काड्याची पेटी बाहेर काढून एक काडी ओढली. त्याबरोबर त्या ओसाड देवळांत एकदम प्रकाश पडला. अशा वेळीं त्या देवळांत कोणी असेल अशी त्याला अंधुकही कल्पना नव्हती. पण काडी ओढून सभोंवताली नजर टाकतांच त्याच्या दृष्टीस फारच भयाण दृश्य पडलें.

तें दृश्य कल्लें होतें ! यशवंतासारखा धीराचा तरुण घाबरून जावा असें तें दृश्य होतें तरी कशाचें ?

यशवंतानें झटकन दुसरी काडी ओढून दिवा लावला. त्याबरोबर ' कोन्, मास्तर ' असे भेदरट उद्गार त्याच्या कानीं पडले. त्याच क्षणीं गोंड्याची तांबडी टोपी घातलेला एक दाढीवाला इसम देवळांतून सापासारखा निघून गेला.

होय ! आंत दोन व्यक्ति, साऱ्या जगाकडे, साऱ्या सद्‌गुणाकडे, साऱ्या पावित्र्याकडे पाठ फिरवून विलासी लीलांत गुंग झाल्या होत्या. त्यांना मनाची पर्वा नव्हती, त्यांना विश्वाची पर्वा नव्हती, त्यांना कुणाचीच पर्वा नव्हती. यशवंतानें काडी शिलगावून उजेड करतांच त्या व्यक्ती भानावर आल्या. एक व्यक्ती बाहेर पळून गेली. दुसरी व्यक्ति मात्र तेथेंच मुकाट उभी राहिली. अरेरे गरीब बिचारी अंबू ! अंबू, काय वेड तुझ्या मनांत आले म्हणून तूं असल्या पापाला बळी पडलीस ! अंबू, तूं महारीण आहेस खरी पण असल्या पापाला बळी न पडतां तूं आपलें सौभाग्य जर जिवापलीकडे जतन केलें असतेस तर तुझी योग्यता हजार महाराण्यापेक्षांही जास्त मानाची झाली असतीस. वेडे ! कोणत्या पापाला भुरळलीस ! कोणत्या मोहाला बळी पडलीस ! केवढ्या भयंकर विषारी जाळ्यांत गुरफटली गेलीस ! तुझ्या मनांत असें पाप तरी आलें कां ! दीड वितीच्या पोटाच्या खळगीसाठीं तूं आपलें सौभाग्य विकलेंस ! अरेरे ! वरून साजिरें गोजिरें दिसणारें हें पोट इतकें जहर विषानें माखलें असेल काय ! पोटाची आग इतकी तीव्र असेल काय ! उपासमारीचा भडका इतका जाज्वल्य असेल काय ! दारिद्र्या, काय या तुझ्या घोर लीला ! दारिद्र्याच्या वणव्यांत भाजून पोळून निघालेले हे दीड वितीचे पोट हतभागी प्राण्याला आपली अब्रूसुद्धां विकावयास लावतें अं ! हेंच खरें ! नाहीं तर मास्तरणींचे पावित्र्य कां दुखावलें गेलें असतें ? नाहीं तर परिचारिका, स्वैपाकिणी, दुसऱ्याच्या घरीं काबाडकष्ट करणाऱ्या मोलकरणी इत्यादि असहाय्य अबलांचे असे धिंडवडे कां उडाले असते ! हे दीड वितीच्या दरिद्री पोटा ! तुझ्या लीला अगाध आहेत हेंच खरें. तुझ्यासारख्या कर्दनकाळाच्या जबड्यांत आजपर्यंत कित्येक अबलांचे लाखमोलाचें

पावित्र्य गडप झालें असेल ! तुझ्यासाठीं आजपर्यंत कितीक गळे कापले गेले असतील ! त्या चिरलेल्या गळ्यांतून खळासळा उडणाऱ्या रक्ताचे केव-ढाले सागर तुडुंब भरले असतील !

' कोन मास्तर ? ' हे शब्द अंबूनेंच उच्चारले होते. ती भ्याली.

' अंबूताई ' यशवंतानें अंबूला प्रेमळपणें हांक मारली. त्याचा कंठ सद्र-दीत झाला. त्याच्या डोळ्यांत वात्सल्याचे अश्रू उभे राहिले. त्याच्यानें जास्त बोलवेना. त्यानें अंबूला एकदम शिरसाष्टांग नमस्कार घातला. तिचे पाय वट्ट धरून तो अक्षरशः रडूं लागला. अंबू महारीण होती. यशवंतानें तिच्या तोंडांत फाटका जोडा जरी मारला असता तरी तिला इतकें वाईट वाटलें नसतें. पण हा प्रकार तिच्या हृदयाला भेदून गेला. ' मास्तर, हे वं असं काय करतां ? ' असें कसेंबसें उद्गारून ती ढळढळां रडूं लागली. आपण कांहीं तरी भयंकर गुन्हा केला हें तिला पूर्णपणें कळलें. मनांतल्या मनांत तिनें स्वतःचे डोकेंहि ठेचून टाकलें. यशवंतानें तिचे पाय धरले त्याबरोबर तिचें काळीज कोणी तरी चरचरा कापीत आहेसें तिला वाटलें.

' मास्तर उठा ! '

' अंबूताई काय केलेंस हें तूं ! ' यशवंतानें कळवळून विचारलें. पण या प्रश्नाला अंबू उत्तर तरी काय देणार ? बराच वेळ ती रडत होती. तिला आतां पूर्ण पश्चात्ताप झाला होता.

थोड्या वेळानें यशवंतानें आपले डोळे पुसले.

' अंबू '

' काय म्हनता मास्तर ? '

' पुन्हां तूं असं करणार नाहींस ना ? '

' नाहीं, नाहीं, मास्तर, मी प्रान देईन पण असं वंगाळ काम कधीं करणार नाहीं. '

अंबूनें यशवंताच्या सांगण्याप्रमाणें मरीआईच्या मूर्तीसमोर डोकें ठेवून पुन्हां तसलें कृत्य न करण्याची शपथ घेतली. तिच्या आयुष्यांत त्या दिव-सापासून फारच क्रांति झाली. खऱ्या सत्यशोधकाच्या प्रयत्नामुळें एक चुक-लेली भारत–कन्या पुन्हां सन्मार्गावर आली. अंबू जरी रस्ते झाडणारी महा-

रीण होती तरी तिच्या आयुष्याचा इतिहास अत्यंत मनोरंजक असा झाला व कदाचित पुढेंमागें तो जगापुढें येईलही. त्या दिवसापासून अनूच्या मुलाच्या—केश्याच्या अभ्यासाकडे यशवंत अधिक लक्ष देऊं लागला.

एका मुसलमानाच्या जाळ्यांतून एका हिंदु अबलेला सोडविल्यानंतर यशवंताला सात्विक आनंद वाटूं लागला. खरा सत्यशोधक प्रत्येक स्त्रीला आपली पवित्र माता समजून तिला असाच तारता हात देत असतो.

यशवंत, बसंत, सुंदर, सर्जा, मोहन वगैरे मंडळींत उत्पन्न झालेल्या संशयकल्लोळाची थोड्याच दिवसांत अगदीं अकल्पित रीतीनें परिसमाप्ती झाली. परिक्षा जवळ जवळ येत होती. जो तो अभ्यासांत गुंग झालेला होता. सुंदर व बसंतही अभ्यासास लागला होता. सरतेशेवटीं गूढ प्रकारानें खुनशीपणानें उत्पन्न केलेल्या संशयकल्लोळाचा अचानक नायनाट करणारा असा एक फारच भयंकर प्रसंग एके दिवशीं विलासपुरांत घडून आला.

---

## प्रकरण २० वें

# " खून ! भिकाचा खून !"

सरतेशेवटीं तो भयंकर दिवस उजाडला. त्या दिवशीं सर्जाच्या माडीवर मोहन व नान्याजी बसले असून सर्जा कोठेंतरी बाहेर जाण्याच्या तयारींत होता. वेळ अशी सकाळची आठाची होती. सिगारेटचा धूर खोलीभर पसरला होता. सर्जानें वडिलोपार्जित इस्टेट जवळ जवळ संपुष्टांत आणली होती हें वाचकांना ठाऊक आहेच. तरीपण अद्याप विलासपुराजवळच्याच एका लहानशा खेड्यांत त्याची दोन तीन चांगली शेतें शिल्लक होतीं. व त्यांतलेंच एक शेत विकण्याचें सर्जानें ठरविलें होतें. व आज ती रक्कम आणण्यासाठींच सर्जा असा सकाळचा त्या खेड्याकडे जाण्यास निघाला होता.

'सर्जा, केवढ्याला विकलंस रे ते शेत ?' नान्यानें विचारलें.

' दोन हजाराला '

' मग सगळे पैसे आजच्च देणार कां तो ?'

' नाहीं. आज फक्त हजारच्च देणार आहे !'

' पण आतां तूं पायीं पायीं जाणार कां?'

' छेः रे ! मूर्खच आहेस. भाड्याची मोटार करून जाणार. '

' मग परत यायला रात्र होईल '

' हो बुवा. आज तर चांगले दहा वाजतील. '

इतक्या वेळ मोहन कांहीं बोलला नव्हता. पण आतां तो बोलूं लागला.

' सर्जा. मग आज रात्रीं तरी निदान इथें बैठक भरूं दे बुवा अलिकडे तूं रात्रीचा आम्हांला येऊन देत नाहींसच, पण निदान आजची रात्र तरी आपण मजा करूं बुवा. काय नान्या ?'

नान्यानें अनुमोदनार्थ मान डोलावली. पण सर्जाला मात्र ही सूचना पसंत पडली नाहीं. तो लागलीच छेः छेः रात्रीं माफ करा बुवा. हवंतर उद्यां सकाळीं मजलस भरवूं ' असें म्हणाला. सर्जाचे हे शब्द ऐकून मोहनानें नान्याला खूण केली व नान्याला त्या खुणेचा अर्थ तात्काळ पटला. आपल्याला कांहींच मागमूस लागूं न देतां हा एकटाच रंगेल पांखराबरोबर दंगल करीत असतो. व म्हणुनच रात्रीं नवाच्या पुढें हा आपल्याला टाळतो असाच त्या खुणेचा सूचक अर्थ होता.

' सर्जा, तूं रात्रीचा आह्मांला तुझ्याकडे कां येऊं देत नाहींसरे ? ' मोहनानें सरळ प्रश्न केला. हा प्रश्न ऐकून सर्जाला किंचित राग आला हें त्याच्या मुद्रेवरून कोणासही स्पष्ट दिसून आलें असतें.

' अरे कां न काय ? रात्रीची जागरणं मला सोसत नाहींत दुसरं काय ! ' सर्जानें उडवाउडवीचें उत्तर दिलें. हें उत्तर ऐकून मोहन फारच कुत्सीतपणें हंसला. थोड्याच वेळांत सर्जानें मुद्दामच विषयांतर केलें. ' मोहन, अलीकडे तुझा यशवंत फार देशभक्ति करूं लागला आहे. '

' चालवलाहेन ढोंग. त्या भटुरड्याची आपल्या हातून उडालेली पोरगी राजरोस लुटण्याचा त्याचा विचार दिसतो आहे. '

'छाः ! असन् गुत्त्यावर उभे राहून लोकांना उपदेश करण्याचा काय आव आणतो !'

'आहेतच ते संभावित धंदे. आमच्या रावसाहेबांनीं फुकट पोसला आहे. म्हणून सुचताहेत हे धंदे दुसरं काय ?'

'पण कायरे मोहन खरंच कांरे तो निर्व्यसनी आहे अगदीं ?' नान्यानें कुतूहलानें विचारलें.

'अं !' मोहनानें तुच्छतापूर्वक हंसून म्हटलें, 'निर्व्यसनी ! अरे कसला निर्व्यसनी ? त्याच्यापेक्षां आपण फार बरे. अरे बाबा त्याचं अलीकडे एका महारणींशीं सूत जमलं आहे. आहे जरा खुपसुरत. जमवलन् झालं !'

'काय महारीण !' नान्या महदाश्चर्यानें उद्गारला. सर्जा व मोहन दांत काढून हसूं लागले.

लोकसेवेसाठीं एका पायावर तयार राहणाऱ्या महात्म्याबद्दल पापी लोक कशा कुचक्या नासक्या शंका घेतात याचें याहून आणखी कोणतें प्रत्यंतर हवें ? एका हिंदू पण पतित अबलेला योग्य मार्गावर आणणाऱ्या यशवंता-बद्दलच या नरपशूंनीं कसले भयंकर संशय घेतले हे ? पण सत्कार्य करणाऱ्या खऱ्या तळमळीनें देशकार्य करणाऱ्या उदार आत्म्यांबद्दल पापी लोक अशा पापी शंका नेहमींच घेत असतात. कोणतीहि मोठी व्यक्ति घ्या, त्यांनीं केलेली लाख मोलाची कामगिरी साफ विसरून कित्येक नादान लोक त्या कर्मवीरांविषयीं हरतऱ्हेच्या अभद्र बाजारगप्पा उठविण्यास बिलकूल कचरत नाहींत. व्यक्तीची गोष्ट तीच राष्ट्राची गोष्ट. अभागी भरतभूमीची अवहेलना व निंदा करणाऱ्या व्यक्ति आहेतच ना ? मेयोसारख्या उनाड पोरी हवीं तीं खोटीनाटीं विधानें करून, भारत मातेच्या उज्वल पावित्र्यावर थुकण्याचा प्रयत्न करीत आहेतच ना ?

कांहीं वेळानंतर सर्व तयारी झाल्यावर सर्जा आपल्या कामाला निघून गेला आणि मोहन व नान्या आपआपल्या निवासस्थानाकडे निघून गेले.

मोहनानें घरांत पाऊल टाकलें तेव्हां यशवंत रावसाहेबांचे पाय रगडीत बसला होता. रावसाहेब अलीकडे बरेच आजारी होते. यशवंतावर मध्येंच गुदरलेल्या त्या भयंकर संकटाची वार्ता कानीं पडल्यापासून त्यांना चांगलाच धक्का बसला होता. शिवाय वार्धक्यामुळें त्यांची शक्तीही दिवसेंदिवस क्षीण

होत चालली होती. त्यांची सेवा करण्यांत यशवंताला आनंद वाटे. राव-साहेबांच्या औरस मुलानें—मोहनानें—मात्र त्यांची फारशी विचारपूसही केली नाहीं. उलट आपल्या पित्याची प्रकृति दिवसेंदिवस खालावत आहे हें पाहून त्याच्या हृदयांत आनंदाच्या उकळ्या फुटत होत्या. तो पित्याच्या मरणाची वाट पहात होता. त्यांच्या पश्चात् सर्व इस्टेटीचे आपण एकटेच मालक होऊन, यशवंताला दाराबाहेर हांकलण्याचा त्याचा निश्चय झाला होता. नानातऱ्हेचे विलास रागरंग, नाच तमाशे राजरोसपणें आपल्या स्वतःच्या घरांतच करण्याची त्याची महत्वाकांक्षा होती. रहत्या घरांत एखादी नाजुक रखेली आणून ठेवण्याची त्याची प्रबल इच्छा होती. आणि या सर्व गोष्टी फक्त रावसाहेबांच्या मृत्युनंतर साध्य होणें शक्य असल्यामुळें तो आपल्या पित्याच्या मरणाची वाट पहात होता. यशवंताचें तसें नव्हतें. आपलें अगदीं लहानपणापासून ज्यानें लालनपालन केलें त्या धर्मात्म्याच्या पायांत स्वतःच्या कातड्याचें जरी जोडे घातले तरीहि उपकारांचें ओझें अंशतः सुद्धां फिटणें शक्य नाहीं हें तो जाणून होता. रावसाहेबांच्या पश्चात या घरांत आपल्याला एक क्षणभर सुद्धां राहतां येणार नाहीं, हें तो पूर्णपणें ओळखून होता. रावसाहेबांच्या इस्टेटीची त्यानें कधींच अपेक्षा केली नव्हती. परंतु आपल्या मानलेल्या पित्याची, त्यांच्या अंतःकालापर्यंत एक-निष्ठपणें सेवाचाकरी करण्याची त्याची इच्छा होती. यशवंत आपल्या वडि-लांच्या पुढें पुढें करतो ते बहुधा आपल्या इस्टेटीचा वांटा मिळविण्या-साठींच अशी दुष्ट कल्पना मोहनाच्या मनांत नेहमीं वावरत होती !

मोहन घरीं येतांच रावसाहेबांनीं त्याला जवळ बोलावलें. यशवंत त्यांचे पाय हळू हळू रगडीत होताच.

‘ मोहन बैस बाळ ’ म्हातारा क्षीण आवाजानें म्हणाला. पण मोहन तसाच उभा राहिला. वडिलांच्या जवळ बसणें त्याला मानहानीचें वाटलें कीं काय नकळे !

‘ हें पहा, माझा कांहीं आतां फारसा भरंवसा नाहीं. माझ्या पश्चात दोघेजण नीटपणें राहून एकमेकांना जपा. ’ म्हाताऱ्याचा हा उपदेश ऐकून मोहनानें विकट हास्य केलें.

'यशवंता ! बाळ—'

'काय रावसाहेब'

'तूं जरी माझा नाहींस, तरी तूं माझ्या मुलासारखाच आहेस. तूं माझा मुलगा नाहींस हें मी तुला सांगितलें नसतें तरी बरें झालें असतें. यशवंता, तुझ्या मनांत परका भाव येऊं नये एवढ्यासाठींच मी जिवंत आहे तोपर्यंत तुला जास्त कांहीं सांगत नाहीं.'

'रावसाहेब तुम्ही मला कांहीं सांगा अगर सांगू नका. पण तुमच्याबद्दल मला परकेपणा वाटेल हें शक्य तरी आहे काय?' यशवंतानें ममतेनें विचारलें.

रावसाहेबांनीं त्याच्या पाठीवरून हात फिरवला. 'यशवंता तुझी जास्त हकीगत तुला त्या मृत्यूपत्राच्या पाकिटांत कळेलच. तोंपर्यंत तरी निदान मी तुला कांहीं सांगत नाहीं. जा बाळांनों, मी आतां जरा स्वस्थ पडतों. दोघेही भावाभावांप्रमाणें वागा म्हणजे झालें.'

'यशवंत आपल्या खोलीकडे गेला व त्याच्या पाठोपाठ मोहनही त्याचे खोलींत शिरला.

'काय हो देशभक्त ?'

'कोण मोहन, मला देशभक्त म्हणतोस ? अरे मनांत आणलेंस तर तुलाही नाहीं का देशभक्त होतां येणार ?'

'अहो शहाणे, महारणीशीं लगट करणारी तुमची देशभक्ती आम्हांला नको बरं.'

'मोहनाचे हे उद्गार यशवंताच्या वर्मीं जाऊन भिडले. मोहनानें निर्माण केलेल्या नीच कल्पना ऐकून त्याच्या अंगाचा भडका झाला, पण मोहनाच्या अंगाला स्पर्शच काय पण त्याला उलटून बोलण्यासही यशवंत केव्हांही तयार झाला नसता.

'यशवंत, आतां रावसाहेबांच्यासमोर तूं नाटक तर फार चांगलें केलेंस. अरे नाटक्या !'

'मोहन, तुझें कांहीं काम आहे कां ?'

'काम ? कां बुवा ? मला कांहीं महारणीवर डोळा ठेवून अस्पृश्यता पाळवायाची नाहीं. आम्हीं सत्यशोधक इतके पापी नाहीं समजलांत ?'

' मोहन, मला आझ्या खोलींत एकटा बसूं देशील कां ! ' यशवंतानें जरा रागानें विचारलें.

' काय ? तुझी खोली ? तुझ्या बापाचें कां रे घर हें ! '

' होय '

' काय हो काय ?'

' रावसाहेब माझे वडीलच आहेत. '

' अरे बिनबाप्या ! इस्टेटीसाठीं तूं कुणालाही बाप करशील. '

' मोहन ! काय बोलतोस हें ?'

' अरे हेंच काय, याहीपेक्षां जास्त बोलेन. काय तुला भितो कीं काय ?' मोहनाचे असले विषारी फूत्कार ऐकणें नको म्हणून यशवंत कपडे घालून स्वतःच बाहेर पडला. तेव्हां नाइलाज म्हणून मोहन आपल्या खोलींत गेला.

त्या दिवशीं सायंकाळीं मोहन आपल्या खोलींत, धूम्रपान करीत धुराच्या ढगांकडे पहात पहात विचार करीत बसला होता. आज त्याच्या मनांत एकच विचार प्रामुख्यानें नांदत होता. व तो म्हणजे सर्जाच्या घरीं रात्रीं जाऊन, त्याच्या प्रेम पात्राबरोबर प्रणय-चेष्टा करणें हा होय. आपल्या नकळत सर्जानें शिकार साधली, व ती आपल्या नजरेसही पडूं न देण्याचा तो अटोकाट प्रयत्न करीत आहे, या त्याच्या अक्षम्य गुन्ह्याबद्दल त्याची अद्याच कोणत्या तरी रीतीनें जिरविली पाहिजे. असें त्याच्या मनानें घेतलें. त्याच रात्रीं सर्जाच्या घरीं जाण्याचा त्यानें निश्चय केला. रात्र जसजशी जवळ जवळ येऊं लागली तसतसा त्याला फार उत्साह वाटूं लागला. रात्रीं अकराच्या सुमारास, हातांत एक छडी घेऊन, वांकडी टोपी घालून, स्वारी सर्जाच्या घराकडे वळली. मागें एकदां नान्याजीबरोबर, मागील दारानेंच तो सर्जाच्या घरीं गेलाच होता. आजही तसाच डाव खेळण्याचें त्यानें ठरविलें.

त्यावेळीं सर्जा आपल्या माडीवर, एका नादान पतितेबरोबर रंगढंग करण्यांत गुंग झाला होता. ती पतित, सुशिक्षित तरुणी, वाचकांना परिचित असलेली गंगू पवारच होती ! !

वाचक, सर्जासारख्या चांडाळाच्या रंगमहालांत आलेली ती व्यक्ति, कॉलेजांतली सुशिक्षित कुमारिका होती असें आम्ही म्हटलें म्हणून भांबावून जाण्याचें कारण नाहीं. ती गंगू पवारच होती. ती कॉलेजांत शिक्षण घेणारी एक सुशिक्षित कुमारिकाच होती. शाळाकॉलेजांतल्या सुशिक्षित स्त्रिया सर्वच कांहीं सीता, द्रौपदी नव्हेत ! हातभर लांबीच्या पदव्या मिळविणाऱ्या सर्वच तरुणी पवित्र असतातच असें नव्हे. आम्ही असलें विधान केल्यामुळें कांहीं संभावित टीकाकारांच्या नाकाला मिरच्या झोंबतील, व त्या भरांत ते प्रस्तुत लेखकावर टारगेपणाचा, अश्लीलत्वाचा, व असत्यतेचा आरोप करण्याचा प्रयत्न करतील हें आम्हीं जाणून आहोंत. पण खरें सत्य लपविण्याचें कांहीं कारण नाहीं. शाळाकॉलेजांतून जाणाऱ्या कोणत्याही तरुण तरुणींत, विलासी वारें असणेंच शक्य नाहीं असें ज्यांना म्हणावयाचें असेल ते कांहीं म्हणोत पण गंगू पवार पतित होती हें खोटें नाहीं. विमल किंवा सुंदर यांच्यासारख्या निष्पाप व पवित्र तरुणी ज्या शिक्षणसंस्थेंत होत्या त्याच ठिकाणीं गंगूसारखी एक बदफैली तरुणीही होती !

'गंगू ! गंगू' असें लाडिकस्वरांत बोलून सर्जानें तिच्या नाकाच्या टोंकाला चिमटा घेतला.

पण त्याच क्षणीं, दुर्दैवानें नुसतें लोटून घेतलेलें, जिन्यांतलें दार उघडून मोहन एकदम आंत घुसला. 'माझ्याशीं लपंडाव काय ?' असें म्हणून धांवत पुढें जाऊन मोहनानें गंगूचा हात धरला. सर्जा संतापला. ऐनवेळीं रंगांत बेरंग करून, आपल्या डोळ्यांदेखत मोहनानें, आपल्या गंगूचा हात धरला हें पाहून सर्जा रागानें वेडा झाला. त्यानें टेबलावरचें एक जड पेपर-वेट मोहनाचें मस्तकावर फेंकलें. तो घाव जिव्हारीं लागून मोहन खालीं कोसळला. पडतां पडतां खुर्चीचें टोंक लागूनही त्याच्या कपाळांतून रक्त वाहूं लागलें ! ! !

---

प्रकरण २१ वें.

## संशय मावळला



मोहन खालीं पडला तरी सर्जाचा संताप ओसरला नाहीं. त्यानें जवळचें फ्लावर पॉटही मोहनाच्या टाळक्यावर फेंकलें. मोहनाच्या डोक्याला चांगलीच जखम झाली व त्यांतूनही रक्ताच्या चिळकांड्या उडूं लागल्या. आपल्या रखेलीशीं दुसरा कोणी इसम अशी लगट करूं लागला की पापी सैतान असेच संतापानें वेडे होतात. सर्जा एवढ्यानेंच थांबला नाहीं. तो मोहना-च्या छातीवर जाऊन बसला व त्याला ठोसे देऊं लागला. गंगू पवारची तर भीतीनें बोबडीच वळण्याची पाळी आली. दोनतीन ठोसे लगावतांच मोह-नानें डोळे फिरवले, व एक आंचका देऊन तो इहलोक सोडून गेला. हा सारा प्रकार फारच थोड्या वेळांत घडून आला. पांचच मिनिटापूर्वी असें असें कांहीं भयंकर होईल हें कोणास सांगून खरें वाटलें नसतें.

मोहनाचा प्राण गेला हें पाहतांच मात्र सर्जा खाडकन् शुद्धीवर आला. गंगू तर एकदम तेथून धांवतच निघून गेली. या भयंकर प्रकाराचा तिच्या अपवित्र मनावर फार तीव्र परिणाम झाला. ती पळत पळतच—धांपा टाकीत वसतिगृहांतल्या आपल्या खोलींत आली. आंत दिवा होताच. तिनें दार आतून घट्ट लावून घेतलें व ती एकदम रडूं लागली. आपलें पाप आतां कांहीं लपत नाहीं एवढेंच नव्हे तर आपल्यासाठीं एका तरुणाचा खूनही झाला हें ध्यानीं येऊन तिच्या डोळ्याभोंवती अंधार माजला.

रडतां रडतां तिला एक सुविचार सुचला. साऱ्या जन्मांत असला विचार तिला बहुधा प्रथमच सुचला असेल. ती रडतां रडतां उठली व टेबलाजवळ जाऊन कांहींसें लिहूं लागली.

गंगू पवार व सर्जा यांची ओळख अशाच चमत्कारीक रीतीनें जमून आली होती. ती ओळख होऊन फार फार तर सहा महिने झाले असतील नसतील आणि त्यांची अगदीं पहिली ओळख एका

सिनेमा-गृहांत झाली. त्या दिवशीं सर्जा एकटाच सिनेमाला गेला होता. व त्याच्या पुढल्याच खुर्चीवर गंगू बसली होती. सिनेमाचा एक भाग संपेपर्यंत कोणी कोणाकडे बघितलें नव्हतें. प्रथम भाग संपतांच गंगू आपला हातरुमाल शोधूं लागली. चित्रपट पाहण्याच्या भरांत हातरुमाल खालीं पडल्याचें तिला साहाजिकच समजलें नाहीं. ती इकडे तिकडे हातरुमाल शोधूं लागली तेवढ्यांत सर्जाचें लक्ष तिच्याकडे गेलें. हातरुमाल गंगूच्या खुर्चीखालीं होता. सर्जानें चटकन् खालीं वांकून तो घेतला. ' ओ, थॅंक्स् ' असे किंचित् स्मित करीत उद्गार काढून गंगूनें हातरुमाल घेण्यासाठीं हात पुढें केला. सर्जानें तिच्याकडे हंसत पाहिलें. गंगूच्या डोळयांतील गहिरा रंग पाहून सर्जा लालचावला. हातरुमाल तिच्या हातांत परत देतांना त्यानें गंगूच्या हाताचीं बोटें हळूच दाबलीं. गंगूला असले प्रकार फार आवडत. आपलें घर सोडून ती एकटीच शिक्षणासाठीं विलासपूरास आली होती. अगोदरच बहकलेल्या तिला, स्वातंत्र्याचा लाभ झाल्यामुळें, ती बेताल होण्याच्या वाटेस लागलीच होती. त्यांत हा प्रकार घडून आला. विषयी वासनेनें अगोदरच संतप्त झालेल्या तिच्या शरिराला, सर्जाच्या एकच स्पर्शानें, आगीच्या खाईत लोटून दिलें.

गंगूशीं झालेली ही ओळख थोड्याच अवधींत पूर्ण परिपक्व झाली. किंबहुना एक दोन दिवसाआड, रात्रीच्यावेळीं, चोरून मारून, सर्जाची गांठ घेण्याची गंगूला संवयच जडली. सर्जानें या नव्या घबाडाचा आपल्या जिगरजान दोस्तांना मागमूसही लागू दिला नाहीं. असल्या कामांत त्याला वांटेकरी कसे खपावेत ! सुंदरनें, यशवंताला लिहिलेलें पत्र, वसंताच्या हातांत देण्याची युक्ति सर्जानेंच गंगूला सुचविली होती.

पण मोहनाच्या खुनाचा प्रकार पाहतांच गंगू बावरली. ती पापी होती तरी स्त्री होती. तिच्या मस्तकांत बदफैल कल्पनांचा सुळसुळाट होत होता तरी तिला अंतःकरण होतें. काय असेल तें असो, त्या क्षणापासून तिच्या डोळयांसमोर तिच्या पातकांची पिशाच्चें थयथया नाचूं लागलीं. तिला स्वतः बद्दल एकदम तिरस्कार वाटूं लागला. आपल्या चारित्र्याची तिला लाज वाटूं लागली. अशा पश्चात्तापाच्या घर्मीतच तिला कांहीं एक कल्पना सुचली

व म्हणूनच ती टेबलाजवळ जाऊन लिहूं लागली. तिनें प्रथम खालील प्रमाणें मजकूर लिहिण्यास सुरवात केली.

रा. वसंतराव मराठे यांसी,

मी आपल्या हातीं तें पत्र दिलें व तुमच्या मनांत, सुंदरचा यशवंतराव देशमुखांशीं कांहीं वाईट संबंध आहे असें भरवून दिलें. माझ्या सांगण्याप्रमाणें आपणासही तसा प्रकार खरा वाटूं लागला. वास्तवीक तसें कांहीं नसून, मीच केवळ सुंदरचा सूड घेण्यासाठीं ती युक्ति केली होती. पण आतां खरा प्रकार सांगून तुम्हां सर्वांचा निरोप घेण्याचें मी ठरविलें आहे. मी कां कशीं, व कुठें निघून जाणार याची माहिती तुम्हांला कदाचित मिळेल कदाचित मिळणार नाहीं. पण तुम्ही आतां सुंदरबद्दल कांहींएक शंका बाळगूं नका. जगांतून जातांना दोन प्रेमी जीवांना एकत्र आणण्याचें तरी सत्कृत्य माझे हातून होऊंदे, म्हणजे तरी परमेश्वर माझ्यावर थोडीशी दया करील. दुर्दैवी गंगू

हें पत्र तयार करून गंगूनें पाकिटावर वसंताचें नांव लिहिलें. नंतर तिनें अशा तऱ्हेनें दुसरें एक पत्र खरडलें.

प्रिय सुंदर,

तुझा मी आजपर्यंत कां हेवा केला हें माझें मला अद्याप कळत नाहीं. पण तुझ्याशीं वर वर मैत्री दाखवून मी तुझा हेवा करीत होतें यांत मात्र शंका नाहीं. सुंदर, तूं यशवंतरावांना खोलींत बोलावण्यासाठीं म्हणून जें पत्र तयार केलें होतेंस तें तुझ्या खोलींतून मीच चोरून नेलें. तें पत्र मी वसंतरावांना दिलें व त्यांच्या भोळया मनांत तुझ्याबद्दल वाईट कल्पना भरवून दिल्या. सुंदर, वसंतराव खरोखरच शुद्ध आहेत. माझ्या खोलींत ते आले होते, तेव्हां तुला फसवण्यासाठींच मी केश मोकळे सोडून वेणी पलंगावर टाकली होती. सुंदर माझी पापें किती भयंकर आहेत हें तुला कदाचित कळेल, कदाचित कळणारही नाहीं. तूं मला क्षमा कर. पुन्हां तुला त्रास देण्यास ही गंगू आतां केव्हांहीं येणें शक्य नाहीं. क्षमा कर.

तुझी दुर्दैवी शेजारीण,

गंगू

हें पत्र तयार करून गंगूनें त्यावर सुंदरचें नांव लिहिलें. दोघां प्रेमी तरुणांच्या प्रेमांत नसतें विघ्न आणल्याबद्दल तिचें मन तिला खात होतें, पण दोन पत्रें लिहून स्वतःचें पाप कबूल केल्यामुळें तिला जरा बरें वाटलें. मजीं यदाकदाचित पोलिसांना सांपडला तर आपल्या बापालाही त्याचा फुटणार, याची तिला भयंकर भीति वाटत होती व तसा प्रसंग येऊन, निदान आपल्या जिवंतपणीं तरी आपणी बेअब्रू होऊं नये यासाठीं तिनें एक निर्वाणीची तोड काढली होती. पहांटेच्या सुमारास ती गपचीप खोलीबाहेर पडली. सुंदरला लिहिलेलें पत्र तिनें तिच्या खोलीच्या दाराच्या फटींतून आंत टाकलें. नंतर ती मुलांच्या वसतिगृहाकडे गेली. परिक्षा जवळ आल्याकारणानें बरेच विद्यार्थी पहांटे उठून अभ्यास करीत होते. त्या सर्वांच्या खोल्यांचीं दारें मात्र बंद होतीं. वसंत आपल्या खोलींत कांहींतरी मोठ्यानें वाचत बसला होता गंगूनें वसंताला लिहिलेलें पत्र दाराच्या फटींतून आंत लोटलें व ती एकदम तेथून झटकली. तिनें स्टेशनचा रस्ता गांठला. कांहींतरी साहसी कृत्य करून स्वतःचा नाश करून घेण्याचा तिचा निश्चय झाला होता.

मुंबईचें तिकिट काढून ती गाडींत बसली. सुदैवानें बायकांच्या डब्यांत गर्दीही नसून फक्त दोन तीनच स्त्रिया होत्या. गाडींत बसतांना गंगूनें मनांल्या मनांत विलासपुराला एक शेवटचा प्रणाम केला.

मोहनला आपण ठार मारलें, त्याचा आपण खून केला हें ध्यानीं येतांच सर्जाचे डोळे साफ उघडले. त्यानें सभोंवार बघितलें. गंगू पळून गेली हें त्याच्या ध्यानांत आलें, त्याचे हातपाय लटपटूं लागले. मोहनच्या थिजलेल्या डोळ्यांकडे त्याला बघवेना. बिचारा धडपडत आपल्या पायांनींच पोलिस चौकीकडे गेला !

थोड्याच वेळांत रावसाहेब देशमुखांच्या घराकडे एका पोलिसाची रवानगी करण्यांत आली. यशवंत आपल्या खोलींत अभ्यास करत बसला होता. ‘रावसाहेब दार उघडा’ असे त्या पोलिसचे शब्द त्यानें ऐकले व खिडकींतूनच त्यानें खालीं वांकून बघितलें. इतक्या रात्रीं आपल्या घरीं पोलिस शिपाई आलेला पाहून यशवंताला महदाश्चर्य वाटलें. तो खालीं आला.

‘साहेब !’

‘ कायरे बुवा, त्या दिवसासारखा पुन्हां मला पकडून न्यायला आलास कीं काय? ’ यशवंतानें थट्टेनें विचारलें.

‘ साहेब, मालकांच्या मुलाचा खून झाला आहे, म्हणून—

पोलिसाचे पुढील शब्द यशवंताच्या कानांत शिरलेच नाहींत. तो जाग-च्या जागीं स्तंभित होऊन वेड्यासारखा इकडे तिकडे बघूं लागला.

‘ मला साहेब तिकडे तुम्हांला बोलावलं आहे ’ हे जरा वेळानें …ले शब्द मात्र कानीं पडतांच तो भानावर आला.

‘ काय, मोहनाचा खून झाला ? ’

‘ होय. ’

‘ कुणीं हें नीच कृत्य केलें ? ’

‘ साहेब, त्या सर्जेरावानंच त्यांना ठार मारलं. ’

‘ अरे, निमकहराम कुत्तरड्या ! ’ असे संतापाचे उद्गार यशवंताच्या मुखांतून बाहेर पडले. आतां ही अमंगळ बातमी ऐकून, अगोदरच आजारी असलेल्या रावसाहेबांना काय वाटेल ही कल्पना त्याच्या हृदयांत कालवा कालव करूं लागली.

‘ साहेब, येतां ना मग ? ’ पोलिसानें विचारलें.

‘ चल, असाच चल. बाकी कोणाला कांहीं कळविण्याची जरुरी नाहीं. ’ असें म्हणून यशवंत तसाच पोलिसाबरोबर निघून, थोड्याच वेळांत सर्जाच्या माडीवर जाऊन पोंहोंचला. पोलिसांची धांवपळ चालू होती. मोहनचें शव पाहतांच यशवंताच्या हृदयांतलें बंधुप्रेम जागृत झालें. त्याला भडभडून आलें. ‘ मोहन...मोहन ’ असे दुःखोद्गार काढून तो रडूं लागला !

पंचनामे, जबान्या, वगैरे भानगडी रीतसर पार पडल्या. रावसाहेबांना कांहीं एक न कळवतां यशवंतानें मोहनाचा अंत्यविधि पार पाडला.

सर्जानें आपल्या जबानींत मी आपण होऊन, रागाच्या सपाट्यांत मोह-नला ठार मारलें असें कबूल केलें. त्यानें गंगूबद्दल माहितीच काय पण तिचा कोठें नामनिर्देशही केला नाहीं. बिचाऱ्यानें फांसावर जातां जातां एवढें एक चांगलें कृत्य केलें, व त्यामुळें गंगूच्या पापाचा जगाला मागमू-सही कळला नाहीं. सर्जाला मुख्य ठाण्याकडे नेत असतां मात्र तो यशवंता जवळ आला.

‘ देशमुख ’

‘ काय ? ’

‘ माझं एक काम कराल कां ? ’

‘ काय ? ’

‘ माझ्या म्हाताऱ्या आईची नीट व्यवस्था लावा. व तिच्या पश्चात् हें सारं घरदार विकून कोणातरी गरिबांना मदत करा ! ’

यशवंतानें सद्गदीत अंतःकरणानें त्याला तसें आश्वासन दिलें !

मरणकाळीं सर्जासारख्या नरपशूनें केवढी उदार इच्छा प्रदर्शित केली ही ! अरेरे, जन्मभर ज्यानें कुविचाराखेरीज दुसरा कसलाही विचार केला नाहीं, त्याला सुविचार फक्त अंतकाळीं सुचावेत ना !

वसंताच्या खोलींत पत्र टाकून गंगू स्टेशनपर्यंत गेली असेल नसेल तोंच वसंतानें-पुस्तक मिटलें. एक जांभई देऊन बाहेर दुसरें कोण कोण उठले आहेत हें पाहण्यासाठीं तो दाराकडे वळला. तितक्यांत दाराजवळ पडलेल्या पाकिटाकडे त्याचें लक्ष गेलें. हस्ताक्षरांवरून तें पत्र गंगूचें असावें हें त्यानें ताडलें. पत्र फोडून त्यानें आंतील मजकुरावरून नजर फिरविली. त्यानें ते पत्र दोनदां, तिनदां वाचलें. नंतर त्यानें समोरच्या आरशाकडे बघितलें. आरशांतला वसंत आश्चर्यानें चकित झाला होता. आरशांतला वसंत पुरी फजिती उडाल्यामुळें लाजला होता. आपण भुलथापांवर विश्वास ठेवून आपल्या जिवलग मित्राचा, व प्रेमळ मैत्रिणीचा केवढा घोर अपमान केला हें ध्यानीं येऊन आरशांतला तरुण बावरला होता. सुन्दरकडे जाऊन तिची एकदम माफी मागण्याचा विचार मनांत येऊन, आरशांतल्या तरुणाला वदनावर मंद–स्मित झळकलें. वसंतानें आरशांतल्या तरुणाला चापट मारण्याचा प्रयत्न केला व दुसऱ्याच क्षणीं तें पत्र हातांत घेऊन तो धांवतच सुन्दरच्या खोलीकडे निघाला सुन्दर अद्याप निजलीच होती.

‘ सुन्दर ! दार उघड ’ दारावर थाप मारून वसंतानें हे उद्गार काढले. वसंताचा आवाज ऐकतांच आंतून कोणीतरी बिछान्याबाहेर टुणकन् उडी मारली. दार सताड उघडलें. सुन्दरच्या बुबुळांत वसंताचें प्रतिबिम्ब दिसलें. वसंताच्या डोळ्यांच्या बुबुळांत सुन्दरचें प्रतिबिंब दिसलें. सुन्दर आंत गेली. वसंतानें आंत पाऊल टाकलें. तोंच पायाकडे नजर जाऊन ‘ अरे हें पहा दुसरें पत्र ’ असें वसंत उद्गारला ! ! !

---

## प्रकरण २२ वें.

# कांहीं दृश्यें.

'अरे, हें पहा दुसरें पत्र' असें उद्गारून वसंतानें सुंदरच्या दारांत पडलेलें, अंगूनें सुंदरला लिहिलेलें पत्र उचलून सुंदरपुढें केलें. सुंदरनें वसंताच्या हातांतून तें पत्र घेतलें व फोडून वाचलें. नंतर दोघांनींहि एकमेकांचीं पत्रें वाचलीं व लागलींच दोघें खदखदां हसूं लागलीं.

'सुंदर मला क्षमा करशील ना!'

'नाहीं करणार बस्स!'

'कां?'

'एक काम करा आधीं.'

'काय तें?'

'स्टो पेटवून दोन कप सुंदर चहा करा'

वसंत हंसत हंसत उठला, करतो काय?

'सुंदर, मला अगोदर यशवंताची माफी मागितली पाहिजे. मी त्याचा फारच घोर उपमर्द केला.' चहापानानंतर वसंत म्हणाला.

'हो अन् मला पण ही हकिगत माझ्या विमलेला सांगितली पाहिजे.' सुंदर उद्गारली.

* * * *

मोहनाच्या मृत्यूची हकिगत रावसाहेबांना न कळविण्याचा यशवंताचा विचार शेवटीं साध्य झाला नाहीं. दोनचार दिवस मोहन दृष्टीस न पडल्यामुळें रावसाहेबांनीं त्याची चौकशी करण्याचा सपाटा चालवला. शेवटीं यशवंताला खरी गोष्ट सांगणें भाग पडलें.

'यशवंता, जेव्हां विचारावें तेव्हां तो बाहेर गेला म्हणतोस, म्हणजे काय? आज चार दिवसांत तो घरींच आला नाहीं कीं काय?'

यशवंतानें अंतःकरण घट्ट केलें. 'रावसाहेब, मोहन आपल्याला सोडून गेला!'

स्वतः रावसाहेबही दोनतीन दिवसांतच इहलोक सोडून गेले.

* * * *

बुइल असलेलें पाकीट यशवंतानें कांपऱ्या हातानें फोडलें. रावसाहेबांनीं आपली सर्व इस्टेट यशवंत व मोहन यांना निम्मेनिम वांटून दिली होती व त्यांतील एखादा दिवंगत झाल्यास सर्व भाग उरलेल्यास मिळणार होता. नंतर यशवंतानें आपलें जन्मरहस्य लिहिलेला कागद उघडला. आपलें जन्मरहस्य बरेंच लांबलचक असेल अशी त्याची कल्पना होती. पण तें फक्त पंधरा वीस ओळींतच लिहिलें होतें.

“यशवंत माधव देशमुख हा माझा खरा मुलगा नाहीं, ही बातमी होतां होईल तों मी त्याला माझ्या हयातींत सांगणार नाहीं, कारण त्यामुळें तो कदाचित मला परका समजूं लागेल, माझें त्याच्यावर पोटच्या पोराप्रमाणें प्रेम आहे, ह्मणूनच त्याच्या माझ्यांत जर परकाभाव उत्पन्न झाला तर मला प्राणांतिक दुःख झाल्यावांचून राहणार नाहीं. मी विलासपुरांत प्लेग झाल्यामुळें कांहीं दिवस सहकुटुंब शेजारच्या खेड्यांत रहात होतों, त्याच सुमारास माझा दूरचा मित्र मला भेटण्यासाठीं ह्मणून माझ्याकडे आला, बिचाऱ्याची पत्नी नुकतीच वारली होती व मनःस्वास्थ्यासाठींच तो माझ्याकडे येणार होता. तो जातीचा ब्राह्मण होता व त्याची माझी प्रथम ओळख होण्याचें कारण त्याचें व माझें नांव व आडनांवही एकच होतें. तो आला तेव्हां त्यानें आपल्याबरोबर आपला पांच महिन्याचा चिमणा मुलगा आणला होता. शेवटच्या बाळंतपणांतच त्याची पत्नी निवर्तली होती, माझ्याकडे तो फार तर दोन दिवसच असेल नसेल तेवढ्यांत प्लेगनें त्याचा बळी घेतला. मरतांना ‘हा मुलगा तुझाच असें समजून त्याला जप’ असें त्या ब्राह्मणानें मला कळवळ्यानें सांगितलें. मला स्वतःलाही त्यावेळीं या नव्या मुलाच्या वयाएवढाच मुलगा होता. आह्मीं तें खेडें सोडून दुसरीकडे गेलों. यशवंत हा माझ्या ब्राह्मण मित्राचा मुलगा आहे, माझा नव्हे. परमेश्वर त्याला उदंड आयुष्य देवो.”

* * * *

आगगाडी भरवेगानें जात असतां गंगू पवारनें एका पुलावर उडी झोंकून दिली. अशा रीतीनें एका सुशिक्षित पापाचा शेवट झाला. सर्जा फाशांवर लटकला. नान्याजी मात्र आपल्या अंबूसमवेत रंगेल दंगल करण्यांत समाधान मानीत असतात.

* * * *

'यशवंत'

'ओहो, कोण वसंत ?'

'मी अनंत अपराधी आहे. मला क्षमा कर'

'कसली क्षमा ? वेड्या, मग असा बावचळला कां होतास ?'

'त्याला कारण हें' असें म्हणून वसंतानें यशवंताला गंगूनें टाकलेल्या विषारी जाळ्याचा सर्व इतिहास सांगितला.

'मग, पुन्हां तूं माझ्या मदतीस येणार तर ?' यशवंतानें कौतुकानें विचारलें.

'अलबत्, येणार' वसंतानें उत्तर दिलें.

× × × × ×

'विमल ! विमल ! अग विमल, हें बघ' विमलच्या खोलींत पाय टाकतांच सुंदर आनंदातिशयानें बोलूं लागली.

'काय ! काय तें ?'

सुन्दरनें, गंगूनें लिहिलेलीं दोन्हीं पत्रें विमलेच्या हातांत दिलीं. विमलेनें तीं वाचलीं. मैत्रिणीवर ओढवलेल्या संकटाचें निरसन झालेलें पाहून विमलेला आनंद झाला. तिनें सुन्दरच्या पाठीवर लडबडणारा शेपटा ओढून, 'आलं कां डोकं ताळ्यावर !' असा प्रश्न केला. सुन्दरनें विमलेचा कान पकडला.

× × × × ×

परिक्षेच्या निकालाचा दिवस. या दिवशीं विद्यार्थीवर्गांत खळबळ उडून गेलेली असते. आणि त्याला आजचा दिवस अपवाद नव्हता. सारे विद्यार्थी निकालाची मोठ्या उत्कंठतेनें वाट पाहात होते. यशवंत देशमूख परिक्षेंत पहिला येणार अशी बऱ्याच लोकांची अटकळ होती, व प्रस्तुत कादंबरीतील एक प्रमुख पात्र म्हणून तरी यशवंत पहिल्या वर्गांत पास होणार अशी वाचकांनाही खात्री वाटत असेल. पण निकाल लागला त्यांत यशवंताचें नांव पहिल्या वर्गांत नसून ते तिसऱ्या वर्गांत, म्हणजे वसंताच्याच मालिकेंत होतें. या वर्षी यशवंतावर संकटांनीं गहजब करून सोडला होता. व तथापि तो परिक्षा पास झाला हें विशेष होय. प्रिव्हियसचा निकाल आधींच लागला होता. त्यांत सुंदर नापास झाली होती व विमल मात्र दुसऱ्या वर्गांत पसार झाली.

× × × × ×

थोडेच दिवसांत विमल–यशवंताचें व सुंदर–वसंताचें कांहीं एक गाजबाजा न करतां लग्न झालें. ब्राह्मण–ब्राह्मणेतरांचें लग्न लागलें म्हणून बऱ्याच लोकांनीं टवाळकीही केली. यशवंत व विमल यांच्या लग्नाबद्दल मात्र लोकांनीं त्यांचा गौरव केला. पण यशवंत जरी मराठा असता तरीही विमलनें त्याच्या व्यतिरिक्त दुसऱ्या कोणासही प्रेम अर्पण केलें नसतें हें निश्चित ! प्रेम जातिजन्मावर अवलंबून नसतें !

× × × × ×

यशवंत खरा सत्यशोधक होता. मोहन व सर्जा स्वतःस जरी सत्यशोधक म्हणवीत तरी ते त्या पदवीला केव्हांही नालायकच होते. सत्यशोधक अमुक एका जातीचा असला पाहिजे असें म्हणणें चुकीचें नाहीं का ? असत्याचें खंडन करून सत्याचा पुरस्कार करण्याचा मक्ता अमुक एका जातीलाच दिला आहे असें असणें शक्य आहे कां ? खरा सत्यशोधक तोच कीं जो कोणत्याही जातीच्या स्त्रीला आपली पवित्र माता समजतो, खरा सत्यशोधक तो कीं, जो जातिभेदाचें बंड न माजवितां समाजसेवेचें उज्वल ध्येय डोळ्यासमोर ठेवून कार्य करतो, केवळ सत्यशोधकत्वाचा पोकळ ढोल मिरवून, त्या पांघरुणाखालीं फक्त ब्राह्मणांचीच निंदा, अवहेलना करणें हें माणुसकीचें लक्षण नव्हे. टिळक, आगरकर, चिपळूणकर अशांसारख्या असामान्य विभूति केवळ ब्रह्मकुलांतच जन्माला आल्या म्हणून त्यांची इच्या त्या शद्धानें निंदा करणें म्हणजे सत्यशोधकीपणा नव्हे, खेड्यांतून तमाशे करून ब्राह्मण ब्राह्मणेतर असा पक्षभेद उत्पन्न करून केवळ ब्राह्मणांची नालस्ती करणें म्हणजे सत्यशोधकी बाणा नव्हे. खरोखर जोतीबा फुल्यांचा मोठेपणा वाढविण्यासाठीं, टिळक–चिपळूणकरांना शिव्या देण्याची जरूरी आहे काय ? व्यक्तीचा मोठेपणा त्यानें केलेल्या सत्कृत्यावर अवलंबून असतो. दुसऱ्यांना शिव्याशाप देऊन स्वतःचा मोठेपणा वाढविण्याचा प्रयत्न करणें खऱ्या सत्यशोधकाला प्राणांतीं देखील रुचणार नाहीं. ब्राह्मण–ब्राह्मणेतर, मराठे–मराठेतर असले वाद काढून एकमेकांचीं डोकीं फोडण्यांत काय अर्थ आहे ? स्वराज्य मिळवावयाचें असेल तर तें एकमेकांत भांडत बसून, एकमेकांच्या उखाळ्या पाखाळ्या काढून एकमेकांचीं नरडीं दाबून कधींही मिळणार नाहीं.

जातिवैमनस्याचीं पिशाचें जोंपर्यंत अभागी भरतभूमींत आहेत तोंपर्यंत स्वराज्य किंवा स्वातंत्र्य मिळणें अशक्य आहे. व मिळालेंच तर तें टिकून राहणें अशक्य आहे. आणि स्वराज्य मिळाल्यावर एकमेकांचीं नरडीं दाबण्याचाच जर सुळसुळाट व्हावयाचा असेल तर तें स्वराज्य न मिळालें तर काय वाईट !

या सर्व गोष्टी विसरून कित्येक समंजस व सुशिक्षित लोकही मुद्दाम ब्राह्मण–ब्राह्मणेतरांत तेढ उत्पन्न करण्याचा प्रयत्न करतात ही लांछनास्पद गोष्ट होय. एकेकाळीं ब्राह्मण समाज ज्ञानधनसंपन्न असा होता. त्या भरांत कित्येक ब्राह्मणेतरांचा त्यानें गुन्हाही केला असेल. कित्येक ब्राह्मणांनीं ब्राह्मणेतरांना लुबाडलें असेल, पण हल्लींची परिस्थिती काय आहे ? हल्लीं ब्राह्मणसमाज फक्त ज्ञानसंपन्न आहे. इतर सर्व बाबतींत ब्राह्मणवर्ग अत्यंत खालावला आहे. तथापि अशा परिस्थितींतही कित्येक स्वतःस पुढारी समजणारे ब्राह्मणेतर लोक आपल्या अनुयायांना भलभलता उपदेश करतांना आढळतात, ' बामणांच्या ' अगर ' भटांच्या ' आयाबहिणींची बीभत्स शब्दांत निंदा करण्याचा कित्येक ब्राह्मण द्वेष्टयांनीं (ब्रह्मद्वेष्टयांनीं) विडाच उचलला आहे. जणूं काय त्यांना आयाबहिणी नाहींतच !

ब्राह्मणांत जसे थोर पुरुष होऊन गेले, तशाच ब्राह्मणेतरांतहि थोर विभूती निर्माण झाल्या आहेत. समाज–सेवेसाठीं जन्म घेणाऱ्या लोकोत्तर व्यक्तींना जातीचा प्रश्न केव्हांच नडत नाहीं. आणि म्हणूनच, परस्परांना शिव्या देत बसण्यापेक्षां, एकजुटीनें, खांद्याला खांदा भिडवून, राष्ट्रसेवा करण्याचा प्रयत्न जेव्हां होईल तेव्हांच स्वराज्य मिळेल, व मिळविलेलें स्वराज्य टिकवतां येईल ! !

× × × × ×

वसंतानें खुद्द विलासपुरांतच एक टुमदार बंगला विकत घेतला. त्याला व त्याच्या पत्नीला मुंबईची हवा मानवत नसे म्हणून विलासपुरांतच कायम राहण्याचें त्यांनीं ठरवलें. दोनच वर्षांत यशवंताचे घरावर व वसंताचे बंगल्यावर नव्या पाट्या झळकूं लागून, सुन्दर व विमल दोघी वकिलीण झाल्या.

× × × × ×

'सुंदर'

'काय ?' सुंदरनें आंतूनच विचारलें.

'अशी इकडे ये बघूं' वसंत म्हणाला.

'मी जरा कामांत आहें. थांबायचं थोडं'

'कसलं काम बुवा ?'

'लिली निजती आहे, तिला निजवून येतें'

'बरं बरं' असें उद्गारून, वसंत पुन्हां टाइम्स चाळण्यांत गुंग झाला.

थोड्याच वेळांत सुंदर बाहेर आली. तिनें खादीचें शुभ्र पातळ परिधान केलें होतें.

'काय म्हटलं आपण ?' तिनें लाडिकपणें विचारलें.

'हें बघ, इकडे ये. बैस अशी.'

वसंताच्या सांगण्याप्रमाणें सुंदर जवळच्या खुर्चीवर बसली.

'सुंदर !'

'काय ? सुंदर सुंदर काय !'

'लिली निजली का ?'

'हो निजली.'

'तुझी विमल आज आली होती का ?'

'हो आली होती. कां ?'

'तिचा छोटा चदू आला होता का ?

'आला होता. कां ?'

'कांहीं नाहीं.'

'म्हणजे !'

'म्हणजे काय !'

'मग कशाला मला बोलावलंत ?'

'सुंदर आपल्या लिलीचं यशवंताच्या चंदूबरोबर लग्न लावायचं ठरलंना?'

'इश्श ग बाई' असें म्हणून सुंदर हसूं लागली.

त्याच वेळीं यशवंताचे घरींसुद्धां त्या दोघांत अशाच प्रकारचा संवाद चालला होता.

* * * *

खेड्यांतून व्याख्यानें देणें, अस्पृश्यांच्या मुलांना शिकवणें, गुरवावर जाऊन उपदेश करणें वगैरे सर्व कार्यक्रम पूर्वीप्रमाणेंच चालू होता. वसंत व यशवंत देशसेवेची खरी तळमळ लागलेले "खरे सत्यशोधक" होते. विमल व सुंदर यांनीं दुपारच्या वेळीं गरीब स्त्रियांना मोफत शिक्षण देण्याचा क्लास काढला आहे. अंबू महारणीचा मुलगा केव्हा गेल्या दोनअडीच वर्षांत [illegible]लाच हुषार झाला आहे. लबाड पुढें कोणीतरी मोठा इसम होणार अशीं आतांपासूनच चिन्हें दिसूं लागलीं आहेत. यशवंत व वसंत यांच्यासारख्या "खऱ्या सत्यशोधकांच्या" नजरेखालीं असल्यावर केव्हा बिघडणें अशक्य आहे.

× × × × ×

'अहो सुंदरराव !'

'इश्श, कोण विमल !'

'कां, सुंदरराव म्हटलें तर राग आला की काय ?' हातांतली छत्री खुंटीला अडकवून खुर्चीवर बसत बसत विमलनें विचारलें.

'अग, गेले ते दिवस आतां'

'हो तेंही खरंच ! पण सुंदर, ती पिंगपॉंगची मॅच आठवते का ग तुला ?'

'कोणती ग ?'

अग ती—मी तुझी फजिती केली ती—

तितक्यांत लिलाबाईंनीं गळा काढला, म्हणून तें बोलणें तितकेंच राहिलें.

प्रकरण शेवटचें

गुड् नाईट.

